॥ श्री ॥

# सवती-मत्सर

हें नाटक

## रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,

'संगीत मेनका,' 'संगीत द्रौपदी,' 'संगीत स्वयंवर,' 'संगीत विद्याहरण,'
'संगीत मानापमान,' 'सत्त्वपरीक्षा,' 'प्रेमध्वज,' 'भाऊबंदकी,'
'कीचक-वध,' 'बायकांचें बंड,' 'सवाई माधवराव यांचा मृत्यु,'
'कांचनगडची मोहना,' इत्यादि नाटकांचे कर्ते
यांनीं लिहिलें.

मुद्रक व प्रकाशक

रा. रा. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,

श्रीदत्तात्रय प्रिंटिंग प्रेस" खटाव मकनजीची वाडी गिरगांव मुंबई नं. ४

( आवृत्ति पहिली )

सन १९२७

किंमत १२ आणे

# प्रस्तावना



रामायणांतील रामराज्यवियोगाचे कथानकांत नाट्याला अनुसरून थोडा फेरफार ह्या नाटकांत केला असून, नाटकांतील त्या त्या प्रसंगांचे फोटो दिल्याबद्दल आणि आपल्यां नेहमीच्या रिवाजाप्रमाणें नाटक फार परिश्रमानें व कौशल्यानें बसविल्याबद्दल 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चे मानावे तेवढे आभार थोडेच आहेत.

'नवाकाळ' ऑफिस, मुंबई
ता. १०-११-१९२७

ग्रंथकर्ता.

॥ श्री ॥

# सवती-मत्सर नाटक.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ स्थळ—कैकेयीचा महाल. दंडकेश्वर प्रवेश करितो. ]

दंड०—देवदैत्यांच्या लढाया वारंवार झाल्या म्हणजे आमच्यासारख्या ाळशाचें ठीक चालतें; दंडकारण्याच्या दक्षिणेच्या शम्बर दैत्याचा राभव करून दशरथ महाराजांनीं मला शम्बर दैत्याचें राज्य दिलें. पण याला आज किती वर्षे झालीं! वैजयंत नगराचा मी राजा आहें, ही गोष्ट ी स्वतःच विसरून गेलों आहें. दंडकेश्वर हें माझें नांव कोणी तरी चुकून ातलें म्हणजे दंडकारण्याच्या दक्षिण भागाच्या त्या देवदैत्यांच्या लढाईची ाठवण होते; पण मी होऊन आठवण करीत नाहीं; मनांतच येत नाहीं.— ायोध्यानगरी सोडून दंडकारण्याचें राज्य करून करावयाचें काय?—वल्कलें ासावींत आणि पल्लवांचा किरीट डोक्यावर घालून फुलांचीं कुंडलें करावींत, ्हणजे दंडकारण्याचा राजा होतो. मी राज्याची गोष्ट काढली म्हणजे ्येकजण मजपुढें वल्कलें ठेवतो आणि डोक्यावर कोणता तरी निर्माल्य आणून ोततो. आज मला माझ्या राज्याची आठवण झाली आहे; शकुन बरा ात नाहीं.—आठवण कशी झाली?—ह्या दासी येत आहेत, ह्यांना विचारून या—(दोन दासी येतात)ए दासींनो, अशा जवळ या आणि नीट उत्तर द्या.

प. दा०—काय आज्ञा आहे ?

दंड०—मला शम्बरासुराच्या वैजयंत नगराच्या माझ्या राज्याची आठवण होते आहे; असा अपशकुन आज मला कां व्हावा ?

दु. दा०—बरोबर आहे महाराज; आपल्या मथरा राणीसाहेब आपणाला आळसेश्वर म्हणत असतात म्हणून आम्हीं सर्वजणी आळसेश्वर ह्याच नांवानें आपला जयजयकार करितों. गेल्या चौदा वर्षांत दंडकेश्वर ह्या आपल्या नांवाचा उच्चारहि आम्हीं केला नाहीं. पण आज चुकून हिनें दंडकेश्वराला हा नजराणा देऊं या म्हणून ह्मटलें—

दंड०—आणि मला अपशकुन झाला!—तुम्हीं ह्या दंडकेश्वराचें डोक्यावर निर्माल्य ओतावयाला आलां आहां काय ?

प. दा०—निर्माल्य नाहीं; नजराणा आणिला आहे, आणि विजया मंत्रीणबाईनीं दिला आहे.

दंड०—देव आळशावर फार फिदा; कोणाच्या तरी मनांत प्रेरणा करितो आणि आळशाला नजराणा पाठवितो. सुमंत्रमंत्र्याची विजया माझ्या मंथरेला पाण्यांत पहाते, असें असूनहि मला नजराणा!—विजयेला बजावलें आहेस नीट, खायचा पदार्थ असला तर मंथरेनें ओटाखालीं घास लोटावा तेव्हां माझी जीभ एखाद्या वेळेला घासाचें ओझें उचलते.

दु. दा०—तें सर्वांना माहीत आहे. विजयाबाईनीं मेवामिठाई कांहीं पाठविलेली नाहीं.—

प. दा०—आणि मेवामिठाई असती तर वाटेंत खाऊन टाकल्याशिवाय आम्हीं कशा राहिलों असतों ? आपल्या जीभेला मिठाईस मिठ्या मारण्याचा त्रास जर आम्हीं दिला तर मंथराबाई आम्हांवर रागावणार नाहींत का ?

दंड०—मग काय आणिलें आहे ?—कसला का आळशी असेना, त्याला कोणीं तरी अन्न चारावें लागतें आणि वस्त्र नेसवावेंच लागतें.—वस्त्र आणिलें आहे काय ?—शुभशकुन दिसतो आहे; ह्या दंडकेश्वराची चलती होणार असें वाटतें.—मंत्र्याचीं वस्त्रें मी अंगावर घालून पहावींत म्हणून सुमंत्र मंत्र्याचीं

वस्त्रें विजयेनें मजकडे पाठविलीं असावींत. सुमंत्राचें मंत्रिपद मला मिळावें म्हणून गेलीं चौदा वर्षे मंथरेनें कोण प्रयत्न केला; पण मंत्रिपद मागण्याकरितां मी दशरथ महाराजांच्याजवळ कधींहि गेलों नाहीं. असेल माझें मंत्रिपद तर येतील मंत्र्याचीं वस्त्रें मजकडे चालून, असा मंत्र हा मांत्रिक चौदा वर्षे जपत आला आहे--पण काय ग, ह्या वस्त्रांत कांहीं कपट नाहीं ना ?—अशा जवळ या—हातांचें ओझें शरिराला फार वेळ सोसत नसल्यामुळें दुसऱ्याच्या खांद्या-वर हाताचें ओझें लादणें आळशांना भाग पडतें. ( दोघींच्या खांद्यावर हात ठेवून ) ह्या बोचक्यांत मंत्रिपदाचीं वस्त्रें आहेत काय ?—पण हो, तुमच्या हातांना मी ह्या देहावर मंत्र्याचीं वस्त्रें घालूं देणार नाही.—मंथरेनें हीं वस्त्रें माझ्या अंगावर घातलीं पाहिजेत.—ती पहा मंथरा येते आहे, बोलाव तिला इकडे.

प. दा०—आपणच बोलवावयाचें होतें—असें खांद्यावर हात ठेवलेले—आम्हीं कसें बोलवावयाचें ?

दु. दा०—माजल्या दासी, असें मंथराबाई नाहीं का म्हणणार ?—आप-णच मोठ्यांदा हाक मारावयाची होती.

दंड०—माझ्याबदला हाका मारायला तुम्ही असल्यावर घोर लागल्या-सारखे माझे शब्द घशांत आंत आंत जातात.—

प. दा०—लागली वाटतें झोंप !

दु. दा०—झोंप लागली कीं घोर लागला !

प. दा०—हाका मारणार ना मंथराबाईना ?

दु. दा०—बोलावणार ना मंथराबाईना ? [ मंथरा येते.

प. दा०—बोलतां बोलतां झोंप लागली—

दु. दा०—असे कसे पेंगूं लागले—

मंथ०—किती झोंप घ्यायची, जेव्हां तेव्हां पेंगलेले, जेव्हां तेव्हां डोळे मिटलेले, आळस द्यायचा जेव्हां तेव्हां, कसल्या ग चुटक्या वाजवतां—मी जर ह्यांचीं बायको नसतें तर ह्या दंडकारण्याचे राजाला एखाद्या झाडाखालीं झोंपीं जातां जातां अस्वलानें नाहीं तर वाघानें केव्हांच काळाची झोंप आणली

असती ! देऊं द्या त्यांना आळस, येऊं दे जांभई–नका वाजवूं चुटक्या–अहो अळसेश्वर, अहो अळसेश्वर, म्हटलें मी मंथरा जवळ उभी आहें, आळसेश्वर.

दंड०—कां मला जागें केलेंस ?–अशी जिथें तिथें माझ्या सुखाच्या आड येतेंस–ह्या दोन दासींनीं जाईच्या फुलाप्रमाणें मला खांद्यावर झेलून धरलें होतें–कां जागें केलेंस !–मंत्रिपदावरून दशरथ महाराजांच्या एखाद्या मांडलिकाच्या गादीवर लेटण्याच्या बेतांत होतों–मध्येंच कां जागें केलेंस !–माझ्या झोपेंत मंत्रिपदाचीं वस्त्रें माझ्या अंगावर ह्या दासी घालणार होत्या–माझ्या झोपेचाहि मत्सर हं !–अगदीं सवतीसारखी माझी झोंप तुला वाटते–वाटायचाच मत्सर–चौदा वर्षें झालीं तूं मला मंत्रिपद देते आहेस–आज बघ आळशावर जशी गंगा येते तशी अनायासें मंत्र्याचीं वस्त्रें चालून आलीं आहेत—

मंथ०—हीं कसलीं ग बोचकीं–पाहूं दे नीट–कोणी दिलीं हीं–आण इकडे–मीच गांठ सोडून पहातें–( तसें करिते ) हीं मंत्र्याचीं वस्त्रें का–हीं का मंत्र्याचीं वस्त्रें–हीं का आपण परिधान करणार ! पहा नीट डोळे उघडून कसलीं वस्त्रें आहेत तीं.

दंड०—( जांभई देत ) माझ्या हातांनीं गांठहि सोडली नाहीं, आणि तीं वस्त्रें कोणत्या मंत्र्याचीं आहेत हें तूं सांगितल्याशिवाय माझे डोळे त्यांच्याकडे पहावयाचे नाहींत. बायकोला कामाची हौस असल्यावर नवऱ्यानें हातांना, डोळ्यानां, कानांना कां त्रास द्यावा ?

मंथ०—हीं वल्कलें आहेत म्हटलें वल्कलें आहेतः–कोणी ग पाठविलीं हीं?

दंड०—मग तीं तूं नेस आणि जा दंडकारण्यांत–मी चौदादुनीं अठ्ठावीस वर्षें दंडकारण्यांत वल्कलें नेसून काढलीं आहेतः–शम्बर दैत्याच्या लढाईत देवांनीं दशरथ महाराजांना मदतीला बोलाविलें, आणि शम्बराला मारल्यावर तुझी माळ माझ्या गळ्यांत घालून दशरथ महाराजांनीं मला अयोध्येस आणलें.–आतां पुन्हां वल्कलें मला नकोत—

मंथ०—कोणी ग दिलीं हीं वल्कलें ?

प. दा.०—आम्हीं असें ऐकलें अळसेश्वर—नव्हे दंडकेश्वर मुख्य मंत्री होणार ह्मणून !

मंथ०—हें कोणी सांगितलें तुम्हांला ?

दंड०—मींच सांगितलें-थोडी झोंप सोडा म्हणजे मंत्री व्हाल, थोडें लेटणें सोडा म्हणजे मुख्य मंत्री व्हाल, आज दोन महिने माझ्या कानीं कपाळीं आरडत आहेस. काल सकाळीं तुझ्या टुमणीमुळें नेहमींहून थोडा लवकर जागा झालों, हा काय चमत्कार म्हणून दासींनीं प्रश्न विचारला, लगेच मी मुख्य मंत्री झालों म्हणून सांगून टाकलें !

दु. दा०—म्हणून आम्हीं खरें खोटें समजून घेण्याकरितां विजया आणि सुमंत्र ह्यांच्या दर्शनास गेलों, तेथें समजलें आज मोठी राजसभा भरायची असून दशरथ महाराज एक मोठा बेत राजसभेला कळविणार आहेत.

प. दा०—मग आम्हीं विजयाबाईंना एकीकडे गांठल्या, ह्यांना मंत्रिपद मिळवून देण्याची खटपट कशी चालली आहे हें त्यांना कळविलें, सुमंत्र मंत्र्याचें जागीं दंडकेश्वर मंत्री होणार काय म्हणून बातमी विचारली—

दु. दा०—त्यावेळीं विजयाबाई रागानें फणफणल्या, माझ्या नवऱ्याचें मंत्रिपद तुझ्या नवऱ्याला पाहिजे तर हीं वस्त्रें घे ह्मणून मन्थरेला सांग असें त्या ह्मणाल्या, आणि माझ्या अंगावर हीं बोचकीं फेकून पाय आपटत आमच्या पुढून निघून गेल्या !-आपण रागावाल तेव्हां दंडकेश्वरांचें कानीं प्रथम सर्व हकीकत घालून—

दंड०—चाणाक्ष आहां-तडफदार बायकोला अपमानाची बातमी आळशी नवऱ्याच्या गाळणींतून पोंचली ह्मणजे तितकीशी झोंबत नाहीं.-मला वाटलेंच अपशकुन झाला ह्मणून, उद्यां सकाळीं दहां पांच हात सूर्य वर आल्याशिवाय उठायचेंच नाहीं.

मंथ०—मी एकटीच सोसतें हो अपमानाच्या सर्व डागण्या, मी एकटीच सोसतें हो.-आपण जर आळशी नसतां-कशी बुद्धि तरतरीत आहे-

शम्बर दैत्याच्या सर्व युक्त्यांचा पाढा दशरथ महाराजांपुढें आपण त्या युद्धाच्या वेळीं वाचलात-मुख्य मंत्री व्हावयाला लायक आहां-पण आळशी-आपणांला कांहीं तरी वाटावें-अळसेश्वर मुद्दाम ह्मणतें-त्या विजयेनें वल्कलें पाठवून अपमान केला-सवतीनें डाव साधावा तशी माझी फजीती करीत असते-अळसेश्वर आतां तरी आळस सोडा, मी तुह्मांला हां हां ह्मणतां मुख्य मंत्री करतें-

**दंड०**—दासीनों, मला जरा लेटावेसें वाटतें आहे; न्या मला खांद्यावर वाहून आणि द्या फेकून एखाद्या मऊ रेशमाच्या ढिगाऱ्यांत-

**मंथ०**—जा, घेऊन जा त्यांना; असल्या आळशालाहि मी मुख्य मंत्री करीन; तुह्मीं निजला तरी मी जागीं राहीन आणि मुख्य मंत्र्यांचें पद संभाळीन. [ दासी दं. ला घेऊन जाऊं लागतात.

**दंड०**—मला मांडलिक राजा कर, ह्मणजे दोघांनाहि झोंप झोडण्यास ठीक पडेल. [ दासी व दंडकेश्वर जातात.

**मंथ०**—( स्वगत ) आज मोठी राजसभा आहे काय ?-मला कशी ही बातमी अगोदर कळली नाहीं ?—आतांशा दशरथ महाराज कैकेयीपाशीं मनांतलें हितगुज बोलत नाहींत-प्रेम अटत चाललें आहे-म्हातारपणीं असें व्हावयाचेंच-महाराज मजजवळ सर्व कांहीं बोलतात म्हणून कैकेयी ऐट मिरविते ती खोटीच एकूण !—कैकेयी अद्याप सुंदर असली तरी दशरथ म्हातारा झाला आहे-वृद्ध राघूला बोलाविणारी धनीण कैकेयी नाहीं-वासिष्ठाशीं नेहमीं खलबत चालतें-कैकेयीला वेळींच सावध केलें पाहिजे-कैकेयीच इकडे येत आहे आणि बरोबर तो वृद्ध सुमंत्र आहे-त्याच्या बायकोनें पाठविलेला हा वल्कलांचा नजराणा देऊं का त्यांच्या तोंडावर फेकून ?—नाहीं, तसें नाहीं करावयाचें. अपशकुन होत असला ह्मणजे जीभ चावली पाहिजे आणि अपमान होत असला ह्मणजे चावलेली जीभ गिळली पाहिजे. ( कैकेयी, सुमंत व तबकांत दोन मुकुट घेणारा सेवक प्रवेश करितात. )

**कैके०**—ह्या मुकुटांचा घाट अपूर्व आहे-जनक राजानें हे कोणाकरितां पाठविले आहेत म्हणून म्हटलेंत सुमंत्रमंत्री ?

सुमं०—युवराज नव्हे भगवान रामचंद्र व देवी सीता ह्यांच्याकरितां आपल्या खजिन्यांतील निवडक रत्नें खर्च करून जनक राजानें हे मुकुट तयार केले आहेत.—लग्नाचे महोत्सवाचे वेळीं खजिन्यांतून जीं जीं रत्नें जनक राजानें बाहेर काढलीं तीं सर्व रामचंद्राचे मुखकमलापुढें फिकीं पडलीं—

कैके०— आणि सीतेच्या लावण्यापुढें अयोध्येच्या खजिन्यांतील सर्व रत्नें दिपून गेल्यामुळें तिकडून सुनेला किरीट करून घालण्याचें सुचलेंच नाहीं—आतां बरें जनक राजाला हे मुकुट करण्याचें सुचलें ?

सुमं०— नारद मुनींनीं तगादा केला; रामचंद्राच्या स्पर्शानें पवित्र होण्याकरितां तुझ्या खजिन्याच्या बंदिवासांत येऊन पडलेली विश्वाची संपत्ति स्वतःच्या भाग्योदयाचे दिवस निघून जातात कीं काय म्हणून दुःखीकष्टी झाली आहे, तिला तांतडीनें अयोध्येकडे पाठीव, म्हणून नारदमुनींनी जनक-राजाला ताकीद दिली; जिकडचा माल तिकडे पोंहोंचविण्याची जनक राजाची कामगिरी बजाऊन दशरथ महाराजांची पूजाअर्चा घेऊन नारदमुनि आतां इतक्यांत निघून गेले; आणि महाराजांच्या आज्ञेवरून हे मुकुट मीं राणी-साहेबांकडे आणिले.

मंथ०—राणीसाहेब, आपणांवर खरें महाराजांचे प्रेम आहे. जनकराजानें रामसीतेकरितां मुकुट तयार केले, पण महाराजांनीं भरतमांडवीकरितां हे मुकुट कैकेयी राणीकडे पाठविले.—जो तो रामाची व सीतेची स्तुति करितो, पण भरतच महाराजांचा खरा लाडका, असें मला वाटतें.

सुमं—महाराजांनीं हे मुकुट नीट पाहिले आणि रामचंद्राच्या व सीतेच्या लावण्याला साजेसें एकहि रत्न ह्या मुकुटांत नाहीं असें महाराजांना वाटून नारदमुनि हट्ट धरून बसले होते तरी रामचंद्राचे मस्तकावर मुकुट ठेवण्याचें महाराजांनीं नाकारलें.

मन्थ०—टाकाऊ माल भरताकडे कैकेयी राणीसाहेब पाठविणार नाहींत.

कैके०— नारदमुनींनीं ह्या खेपेस मला कसें दर्शन दिलें नाहीं ?

सुमं०—नारदमुनी जरा घाईत होते. एकांतांत बरेंच बोलणें होऊन नारदमुनी गेल्यावर राजसभा बोलावण्याची आज्ञा महाराजांनीं केली; मी

तशी व्यवस्था करून परत आलों तों महाराजांनीं हे मुकुट आपल्या महालांत नेऊन ठेवण्यास मला सांगितलें, आणि—ते पहा महाराजच युवराज रामचंद्र व सीतादेवी यांना बरोबर घेऊन इकडेच येत आहेत—महाराजांचा जयजयकार असो. [ दशरथ, राम, सीता येतात.

दश०—सुमंत्र मंत्री, राजसभेची वेळ झाली आहे; आपण राजसभेकडे ताबडतोब जा, आणि वसिष्ठ गुरुजींना सांगा मी तुमच्या पाठोपाठ आलोंच म्हणून.

सुमं०—आज्ञा, महाराज. [ जातो.

कैके०—ह्या मुकुटांचें काय करायचें ?

दश०—मुकुटांचें काय करायचें ! त्याचसाठीं येथें आलों आहे.—अयोध्येच्या राजमुकुटापेक्षां ह्या मुकुटांतील रत्नें अधिक दैदिप्यमान आहेत—पण माझ्या रामाच्या मुखकमलाची शोभा ह्या रत्नांना नाहीं—माझ्या डोळ्यांना कदाचित् भ्रम झाला असेल—विश्वांतील सौंदर्याची पारख करावी तर आपणच करावी, अशी आपली कीर्ति आहे.—खरें सांगायचें हं, मुकुटामुळें रामाला शोभा येईल का रामामुळें मुकुटाला शोभा येईल ?

कैके०—सीते, तूं सांग हं, ह्या मुकुटामुळें माझ्या रामाचा चेहरा अधिक सुंदर दिसेल का ?—लाजूं नकोस—इकडच्या देखत सांगायला कांहीं हरकत नाहीं—

सीता०—मला नाहीं बाई ह्यांत कांहीं समजत. समुद्राला एखादी नवी नदी मिळाली म्हणून समुद्राचें पाणी थोडेंच वाढल्यासारखें दिसणार आहे !

कैके०—सून पण सून मिळाली आहे, आपल्या सर्व राण्यांचें नांव मागें पाडील हो.

दश०—इतरांचें तसें होईल पण तुझें नांव कोणीहि विसरणार नाहीं.—रामा, तूं सांग हा मुकुट तुला शोभेल का ? हा मुकुट सीतेला शोभेल का ? सांगना—अरे बायकांनीं लाजावें—माझ्या रामाचें वय अजून कोवळेंच आहे असें नाहीं तुला वाटत ?—लग्नाहून परत येतांना परशुरामाची गांठ पडली

तेव्हां माझ्या पोटांत धस्स झालें; माझ्या रामानें हां हां म्हणतां एका बाणानें परशुरामाचा गर्व नाहींसा केला; आणि त्या वेळीं देखील मला माझा राम चिमुकला नाहीं असें कांहीं केल्या वाटलें नाहीं.–ह्या मुलामुलींना काय समजणार आहे ? आपण सांगायचें, हा मुकुट रामाला शोभेल ना ?

**कैके०**—पण रामाला सांगूदेना त्याला काय वाटतें तें अगोदर.–बायकोचें नको हं अनुकरण करूं–सरळ सरळ सांग–उखाणें नको घेऊंस–उखाणे घेण्यांत सीता फार पटाईत आहे हो–हिच्या वयांत मला नव्हतें असें उपमा-दृष्टांत देऊन बोलायला येत–काय आठवतो कां तुला एखादा उखाणा–पुरुषांना ह्यातारपणींहि तें माधायचें नाहीं.

**दश०**—खरें आहे.–रामा, तूं सरळ सरळ तुला काय वाटतें तें बोलून टाक.

**कैके०**—इतका काय गोंधळांत पडला आहेस ? सीतेनें तुला लाजविलें हं–कसें चट्दिशीं उत्तर दिलें–सौजन्यांत व विनयांत इकडचें नांव माझा राम मागें टाकील हं.

**मंथ०**—तसें कांहीं होणार नाहीं. महाराज ते महाराज. दहा रथांत बसून दिग्विजय करणाऱ्या सूर्यामागून येणारा चंद्र कितीहि मनोहर असला तरी सूर्याची आठवण कशी बुजवील ? महाराज ते महाराज; सौंदर्याची राणी कैकेयी ती कैकयी, आणि आमचा भरत तो भरत—

**कैके०**—उगीच कां मध्यें बोलतीस ग !–सांग ना रामा, तुला काय वाटतें तें ?

**राम०**—आई, ही बोलली तेंच खरें आहे. भरत तो भरत, ह्यांत संशय नाहीं. प्रत्येकांतील न्यून भरून काढण्याची जी हातोटी भरताला साधली आहे ती रामाला साधलेली नाहीं. ह्या मुकुटांत जर कांहीं दोष असेल तर तो दोष भरताचे मस्तकावर हा मुकुट ठेवण्याबरोबर तेव्हांच नाहींसा होईल. बाबा, आई, विश्वामित्र महर्षींनीं जेव्हां यज्ञाचें संरक्षण करण्याकरितां मला व लक्ष्मणाला नेलें, तेव्हां भरताला कां बोलाविलें नाहीं म्हणून मीं प्रश्न केला. त्या वेळीं त्यांनीं मला सांगितलें, राक्षसांना मार म्हणून सांगितलें कीं मारणारा

धनुर्धारी सर्व ऋषींना आज पाहिजे आहे, तुझ्या धनुष्यांतील कठोरपणाला मऊ करून पराक्रमांतील दोषांनाहि उज्ज्वल रत्नें बनविणारा भरत आज ऋषींना नको आहे.

कैके०—ह्मणजे ? विश्वामित्र ऋषींचें हें ह्मणणें माझ्या नाहीं ध्यानीं आलें.

राम०—लग्नाच्यावेळी भरत आणि मी बोलत असतांना, विश्वामित्र ऋषींनीं माझ्यापुढें आरसा धरला आणि हिला समजून सांगितलें, आरशांत दिसणारा राम व प्रत्यक्ष भरत अगदीं तंतोतंत एक आहेत कीं नाहीं तें पहा.—माझा डावा हात तो भरताचा उजवा हात, माझा उजवा हात तो भरताचा डावा हात, ह्या पलीकडे भरतांत व रामांत कांहीं फरक नाहीं, असेंच हिला दिसलें. त्यावेळीं वसिष्ठ व विश्वामित्र ह्या दोघांहि ऋषींनीं आम्हा दोघांना बजावलें, रामाच्या अजिंक्य बाणाचा पराक्रम व भरताचा स्वयंभू यज्ञ ह्यांत काडीचाहि फरक नसून, रामाच्या पराक्रमांतील दोप भरताच्या यज्ञानें पवित्र व सुशोभित होणार आहेत. ब्रह्मादिकांनीं कष्टतर तपश्चर्येनें सिद्ध केलेलीं सर्व शस्त्रास्त्रें इक्ष्वाकु कुलाची कीर्ति पराक्रमांत वाढावी म्हणून विश्वामित्र ऋषींनीं मला व लक्ष्मणाला दिल्यानंतर पुन्हां बजावून सांगितलें, राक्षसांचा संहार करतांना तुम्हां दोघांचें जर कुठें चुकलें तर तें न्यून भरून काढून तुमचा पराक्रम पवित्र करण्याचें सामर्थ्य पृथ्वीतलावर आज एकट्या भरतांत आहे. म्हणून म्हणतों आई, हा मुकुट भरताच्या मस्तकावर ठेविल्याशिवाय रामाला हा मुकुट पवित्र करील किंवा कसें हें समजणार नाहीं. बाबा, जनकराजानें पाठविलेलें हे मुकुट भरत आजोळी गेला आहे तेथें कां आपण पाठवून देत नाहीं ? आई, भरतानें मुकुट मस्तकावर घातला म्हणजे मीच मुकुट मस्तकावर धारण केला, असें नाहीं का होत ? आरशांतला राम ह्मणजे भरत आणि आरशांतला भरत म्हणजे राम.

कैके०—रामा, तूं असा बोलूं लागलास, तुला डोळे भरून एकसारखें पाहिलें, माझा भरत ह्मणून दुसरा निराळा आहे असें मला वाटतच नाहीं.—हा मुकुट तुझ्याच मस्तकावर ठेविला पाहिजे. पण आतां नाहीं—जनकराजा-

पेक्षां मजजवळ अधिक दैदिप्यमान रत्नें आहेत–तीं रत्नें ह्या मुकुटांत बसविलीं पाहिजेत–मी स्वतः हें काम करणार–इकडची आज्ञा आहे ना तशी ?

**दश०**—तुझीं सर्व रत्नें उदईक रामाला आणि सीतेला सुशोभित करतील आणि त्यांच्या पसंतीला तीं उतरतील–रामा, सीतेला शोभणारीं रत्नें—

**कैके०**—मला आतांच सांग पाहूं सीतेला काय शोभेल ?–तुला काय शोभेल तें मला समजतें—

**मन्थ०**—भरताला जें चालेल तें रामाला शोभेल, पण बाई सीतादेवीला–

**राम०**—आम्हीं सर्व आईच्या पोटांतून जन्माला आलों आहों; ही स्वयंभू आहे. रत्नांनीं झांकली काय आणि वल्कलानें अच्छादिली काय, फरक मुळींच दिसणार नाहीं.

**दश०**—राजसभेची वेळ झाली; ह्या मुकुटातील कोणतीं रत्नें बदललीं पाहिजेत ह्याचा नीट विचार आपण करून ठेवा, बरें.–राजसभेंत माझ्या मनासारखें झालें–रामा, तुह्मी जा आतां आपल्या मंदिराकडे, राजसभा संपल्यावर मला तुझ्याशीं कांहीं तसेंच महत्त्वाचें बोलावयाचें आहे–रत्नांची निवड करतांना तुमचा कांहीं उपयोग होईल म्हणून बोलाविलें होतें–आपणापुढें ह्यांना काय कळणार ? ज्याची त्यानें निवड करावी, उगीच वांटलें झालें–जा तुम्ही–( राम, सीता नमस्कार करून जातात. )–जा, मग मी बोलावीन, ताबडतोब या हं–आतांच्या आतां सर्व रत्नांची निवड करून ठेविली पाहिजे–असा रत्नपारखी जगांत दुसरा मिळणार नाहीं–नजरेंतील चमक जरा रत्नावरून फिरली, सेनानायकाला पाहिलें असतां ज्या प्रमाणें सर्व सैन्य आपापल्या पायरीनें उभें राहतें व लवून मुजरा करतें, त्याप्रमाणें सर्व रत्नें आपल्यासमोर आपापली पायरी आपोआपच ओळखूं लागतात–करायचें ना हें काम ? राजसभा संपली ह्मणजे कामकाजाची व्यवस्था लावून मी आपणाकडे धावत आलोंच म्हणून समजा.–जाऊं मी राजसभेकडे ?

**कैके०**—आज राजसभेंत इतकें कसलें महत्त्वाचें काम आहे ? माझ्या महालांत येऊन उभाउभी निघून जायचें आजपर्यंत झालें नाहीं–नारदमुनींनीं हे मुकुट कां आणले, मला दर्शन दिल्याशिवाय कां निघून गेले—

मन्थ०—कौसल्या राणीसाहेबांना नारदमुनींनीं आज दर्शन दिलें–

कैके०—मला कां नारदमुनि आले होते तेव्हां बोलावणें पाठविलें नाहीं?

दश० अग रामाबद्दल ते बोलत होते, रामाची आई ह्मणून तिलाहि भेटून गेले, त्यांत कांहीं विशेष नाहीं. राजसभा झाली ह्मणजे रामाबद्दल काय काय बोलले आणि मी राजसभेंत काय काय केलें ऐकलेंस कीं खूष होऊन जाशील. जितक्या घाईनें मी जातों आहे, तितक्याच घाईनें परत येतो बघ–रत्नांची निवड लवकर करून ठेव–उदईक सकाळीं पुष्यनक्षत्राचा योग आहे आणि त्या वेळीं तूं निवडलेल्या रत्नांची जरुरी लागेल—

कैके०—दोघांनीं मिळून रत्नें निवडूंया—

दश०—मी माझ्या आयुष्यांत एका रत्नाची काय ती निवड केली, आणि आतां त्या रत्नानें माझ्या रत्नपारख्याचें काय केलें पाहिजे–येतो पहा जलदीनें. [ जातो.

कैके०—माझ्यावर खरें प्रेम आहे–तरुणपणचे महाराज आणि आजचे महाराज–कांहीं फरक नाहीं–असलें प्रेम ह्मणजेच स्वर्गसुख नव्हे का मंथरे !

मन्थ०—अजागळ ग अजागळ–खरें प्रेम–नाहीं ग बाई मला माझ्या जन्माची धडगत दिसत नाहीं–आळशी पुरुष आणि भोळी बायको, दोघांचाहि जन्म व्यर्थ–राजसभेचें कामकाज तुला सांगितलें का ?–खरें प्रेम–नारदमुनि कौसल्येला भेटले, तुला भेटले का ?–खरें प्रेम–मुकुटांचा विचार करतांना तुझ्या खाजगी खजिन्यांतील दुर्लभ रत्नांची आठवण झाली; भरताची आठवण झाली का ?–खरें प्रेम–भरतमाता ह्मणजे विश्वांतील अत्यंत श्रेष्ठ नररत्नाची खाण ह्या तुझ्या पदवीची आठवण—

कैके०—हें काय बरळतें आहेस ?–खरें प्रेम माझ्यावरच—

मन्थ०—शब्दांत, केवळ शब्दात–राममाता ह्मणून कौसल्येला नारद-मुनींच्या भेटीचा लाभ–भरतमातेला विचारतो कोण ?

कैके०—भरत आणि राम, ह्यांत फरक राम मानीत नाहीं, भरतालाहि दिसत नाहीं, आणि मला तर राम मजपुढें उभा असतांना माझा भरतच

उभा आहे असें वाटतें; मग राममातेला विचारलें काय आणि भरतमातेला विचारलें काय, सारखेंच नव्हे का? राममाता मी आणि भरतमाता कौसल्या, समजलीस?–तू रामाला डोळे भरून पहात नाहीस–जा एकसारखी टक लावून प्रहरभर रामाला पहा; रामदर्शनाच्या अंजनानें तुझ्या डोळ्यांतील मत्सर वाहून जाईल आणि मी कौसल्या आहें असें तुलाहि दिसू लागेल.

**मन्थ०**—भाबडी ग भाबडी!–आतां इतक्यांत तूं रामाला पाहिलेंस, मीहि पाहिलें–त्याच्या जन्मापासून मी एकसारखी टक लावून पाहतें आहें त्याला–माझ्या डोळ्यांत मत्सर मुळींच नाहीं–खरें खरें मला दिसतें–आणि तुझें कल्याण व्हावें म्हणून जें खरें खरें दिसतें तें सत्य तुझ्यापाशीं मी बोलतें–मी सत्यवादी आहें; मत्सर मजपाशीं बिलकूल नाहीं–पुत्रप्राप्तिकरितां महाराजांनीं यज्ञ केला आणि यज्ञाचा प्रसाद ऋष्यशृंगांनीं तुह्मां राण्यांना वाटून दिला त्या वेळेपासून जें सत्य मला दिसत आहे तें तुला, माझी आवडती मालकीण, माझी प्रेमाची मैत्रीण, अश्वपाल देशाची खरी कैवारी माझीच दुसरी प्रतिमा म्हणून सांगत आहे–नाहीं ग–तुझा आणि माझा स्नेह तसाच आहे–मी कैकेयी आणि तू मन्थरा इतका तुझा आणि माझा जीव एक आहे—

**कैके०**—मग तुला राम आणि भरत ह्यांत फरक कसा दिसतो?

**मंथ०**—भरत श्रीविष्णूचा खरा अवतार आहे व राम भरताचें प्रतिबिंब आहे, असें माझ्या डोळ्यांना स्वच्छ दिसतें; त्याला मी काय करूं?–यज्ञाच्या प्रसादाचा अर्धा वाटा कौसल्येला देऊन सर्व ऋषींनीं तुझी दिशाभूल केली; पण श्रीविष्णूंनीं अवतारापूर्वीचें शयन तुझ्याच गर्भाशयांत केलें हें मला माहीत आहे.–मी कांहींतरी उगीच बरळतें असें समजूं नकोस.–ब्रह्मा, विष्णू, शंकर यांना प्रसवणाऱ्या आदिशक्तीचें वसतिस्थान म्हणजे बायकांची कुक्षि होय आणि बायकांच्या अंगच्या ह्या आदिशक्तीपुढें सर्व देवतांनीं व पुरुषांनीं नमलेंच पाहिजे–कैकेयी, त्या आदिशक्तीचा पूर्ण अवतार तूं आहेस—

कैके०—माझी भलती स्तुति केल्यानें मी फसेन, असें का वाटतें तुला मंथरे !

मंथ०—मी तुला फसवीत नाहीं–सत्य आहे तें तुला सांगत आहें–तूं आदिशक्ति नाहींस ? मग अयोध्येचा सम्राट् इतकीं वर्षें तुझ्या हातांतलें खेळणें कसा झाला आहे ? तूं आदिशक्ति आहेस आणि तुझ्यापुढें कोणाचें कांहीं चालणार नाहीं, हें ओळखूनच तुझा मत्सर करणाऱ्या सर्व पुरुषांनीं–वसिष्ठ–विश्वामित्रासारख्या धेंडांनीं, राम म्हणजे विष्णूचा अवतार असा गवगवा चालविला आहे, समजलीस ? विष्णु कौसल्येच्या पोटीं येणार, अशी खोटी भुमका ह्यांनींच पिकविली आणि महाराजांना पुत्रप्राप्तीचा यज्ञ करावयास लाविलें—

कैके०—त्या यज्ञाचा प्रसाद मलाहि मिळाला आणि मला भरत झाला.

मंथ०—यज्ञामुळें झाला ?–पुत्रप्राप्तिकरितां तुला यज्ञाची काय जरुरी होती ?– तुझी कुक्षि ह्मणजे विश्वांतील अत्यंत श्रेष्ठ यज्ञभूमि–त्या कुक्षीच्या प्रसन्नतेहून अधिक श्रेष्ठ यज्ञ विश्वांत कोणता आहे ? त्या यज्ञाहून निराळा यज्ञ राजा दशरथाला ह्या ऋषींनीं करावयास लाविलें, तुझ्या कुक्षीचा अपमान केला–तो यज्ञ जर झाला नसता तर तुला एकटीला मुलगा झाला असता आणि तुझ्या सवती वांझोट्या ठरून–जाऊं दे–झालें तें झालें–त्या वेळीं पुत्रप्राप्तीच्या यज्ञास संमति देऊन फसलीस–आतां तरी सावध हो आणि—

कैके०—पण आतां काय आहे त्याचें ? आतां मला कोण फसविणार आहे?

मंथ०—अग यज्ञ करून रामाला विष्णूचा अवतार बनविला, हा पहिला डाव–ध्यानांत घे ह्या ऋषींच्या युक्त्या–बडे कावेबाज आहेत बरें–विश्वामित्रांनीं भरताला न बोलावतां रामलक्ष्मणांना बोलवून नेऊन अस्त्रविद्येचे सर्व मंत्र त्यांना दिले, हा दुसरा डाव–स्वयंभू जन्मास आलेली सीता रामाला दिली, भरताला दिली नाहीं, हा तिसरा डाव–आणि आज मुकुटांना पुढें करून तुझ्या खाजगी रत्नांवर दरवडा घालण्याचा चौथा डाव.

कैके०—महाराजांनीं आपण होऊन सर्व रत्नें मला दिलीं आहेत; माझा

खाजगी खजिना पृथ्वीवरील सर्व राजांच्या खजिन्यांहून अधिक मौल्यवान आहे, हें खरें; पण मी एकहि रत्न हौसेनें किंवा रुसून मागितलें नाहीं.

**मंथ०**—म्हणूनच तुला मी आदिशक्तीचा पूर्ण अवतार समजतें.–विश्वांतील सर्व धनांवर व रत्नांवर बायकांची सत्ता स्वयंभू आहे.–पुरुषांनीं आपण होऊन द्रव्य दिलें तर बरें; नाहीं तर सर्व द्रव्य पुरुषांपासून लुबाडून घेण्याचा हक्क बायकांना जन्मसिद्ध आहे.–तुझ्यासारख्या मूर्तिमंत आदिशक्तीकडे सर्व रत्नें आपण होऊन चालून येतात; इतर बायकांना युक्तिप्रयुक्तीनें पुरुषांच्या मगरमिठींतून सर्व द्रव्य हिरावून घ्यावें लागतें, इतकाच फरक.

**कैके०**—माझ्या पायांवर लोटांगणें घालीत लक्ष्मी मजकडे आली असून मी माझ्या खासगी खजिन्यांत विश्वांतल्या लक्ष्मीला कैद करून ठेविलें आहे—

**मंथ०**—हाच बायकांचा मुख्य पराक्रम –संचयाची मालकीण स्त्री; ही प्रतिष्ठा कांहीं केल्या सोडूं नकोस.–मुकुटांची बाब पुढें करून तुझीं रत्नें लुटण्याचा डाव नारदमुनींनीं आरंभिला आहे–घरांतले भामटे पुरे झाले–वसिष्ठविश्वामित्रांत नारदाची भर आतां पडली आहे—

**कैके०**—श्रेष्ठ ऋषींवर असले घाणेरडे आरोप—

**मंथ०**—मी चुकत असेन, पण आतांच्या वेळेपुरतें–फक्त दोन प्रहर माझें ऐक–नाहींतर दंडकारण्यांत जावयास मला निरोप दे कशी–माझा कंटाळा तुला आला आहे–जन्माची मैत्रीण–मी नको आहे तुला–जाऊं द्या दंडकारण्यांत मला—

**कैके०**—असा त्रागा काय करतीस? माझ्या खालोखाल अयोध्यानगरींत तूं सुंदर आहेस–समारंभाच्या मिरवणुकींत तूं माझ्यापुढें चालत असलीस म्हणजे जगांतील सर्व संपत्ति मला ललकारीत आहे असें आपोआप जगजाहीर होतें–तुला मी कशी ग सोडीन?

**मंथ०**—मग आज दोनच प्रहर माझें ऐक.

**कैके०**—काय करूं? सांग एकदां—

**मंथ०**—तुझ्या खाजगी खजिन्याच्या किल्ल्या दोनप्रहर मी माझ्या ताब्यांत घेतें.–(तसें करते) आतांची सायंकाळची राजसभा आटोपल्याव

महाराज कौसल्येकडे प्रथम जातील, आणि उत्तर रात्रीं तुझ्या मंदिरांत येतील. तोंपर्यंत एकहि रत्न तुझ्या खजिन्याच्या पेट्यांतून बाहेर पडतां कामा नये म्हणून ह्या किल्ल्या मी माझ्या कडोसीला ठेवतें.—राजसभेची बातमी मी आतां काढतें—कपटव्यूह जर आढळला—आहेच कपट—प्रत्येक शब्दांत, प्रत्येक विचारांत, प्रत्येक पावलांत कपट आहे—महाराज यावयाच्या आंत मी तुझ्या महालांत परत येतें—कपट तुला पटविलें—महाराजाशीं कसें वागावयाचें, तुझें तुला समजतेंच आहे—कपट पटवितां जर आलें नाहीं—

**कैके०**—मग काय करशील ?

**मंथ०**—श्रेष्ठ पुरुषांवर खोटे आरोप घेण्याच्या पातकाबद्दल प्रायश्चित्त घेण्याकरितां मी दंडकारण्यांत सूर्योदयापूर्वी निघून जाईन. [ जाते.

**कैके०**—( स्वगत ) किल्ल्या घेऊन गेली—बरें झालें लवकर गेली, नाहीं तर महाराजांविरुद्धहि माझें मन हिनें बिथरून सोडलें असतें.—भरताचा मत्सर कौसल्या करीत असेल—पण तिकडून काय म्हणून भरताचा मत्सर करण्यांत यावा ? रामलक्ष्मण भरताचा मत्सर करीत असतील काय ? राम—राम—नाहीं ग बाई माझ्या रामाबद्दल अशी शंकाच घेतां कामा नये.—राम कोणाचा मत्सर करीत नाहीं आणि रामाचा मत्सर कोणीं करूं शकणारच नाहीं—पण लक्ष्मण—काय सांगावें बाई कोणाच्या मनांत काय असेल तें—रामाच्या मनांत कांहीं नाहीं —पण लक्ष्मणाच्या मनाचा थांग मला कोठें लागला आहे ?—माझ्या जवळच्या रत्नांचा हेवा—लक्ष्मणाला—लक्ष्मणाला—हें बरोबर नाहीं. मंथरेच्या पावलावर पावलें टाकीत मी चालूं लागलें—लक्षण ठीक नाहीं—राजसभेचें कामकाज जर आतां नसतें तर रामाला बोलावून आणून—रामाच्या मुखांतील प्रत्येक शब्द महामंत्रच असतो—मंथरेनें माझ्या मनांत माजविलेलें काहूर तेव्हांच नष्ट केलें असतें.—रामाचें प्रत्यक्ष दर्शन जरी आतां होणारें नसलें, दोन प्रहर राम राम राम असा रामनामाचा जप करून मंथरा येण्यापूर्वी मी माझें मन शांत करून टाकतें. [ जाते.

## प्रवेश दुसरा.

[ स्थळः—सुमंत्र मंत्र्याचे मंदिरापुढील पटांगण. विजया व एक दासी प्रवेश करितात. ]

विज०—सर्व दासींना नीट बजावलेंसना, आतांच्या आतां सर्व मंदिर दीपोत्सवानें सुशोभित झालें पाहिजे ह्मणून–सर्व पटांगणांत चंदनाचे सडे घाला–विजयपताका आपल्या मंदिरावर उभारा–रस्त्यावर तोरणें लावा–दीपवृक्षावर सर्वांना ध्वजा दिसल्या पाहिजेत–आणि आजच्या रात्रींच्या दीपोत्सवांत—

दासी०—सुमंत्र मंत्र्यांचें मंदिर आनंदानें सर्वांच्या अगोदर दुमदुमत राहिलें, असें अयोध्या नगरींत सर्वांच्या तोंडीं झालें पाहिजे, अशी व्यवस्था ठेविली आहे; विजयादेवींनीं कांहीं काळजी करूं नये.

विज०—मग अजून आमचा दीपोत्सव व आमचा थाटमाट पहावयाला कोणी कसें आलें नाहीं ?

दासी०—आतां इतक्यांत गर्दी होईल–पटांगणांतील सर्व दिवे लागल्यावर तारांगणांतील चंद्राप्रमाणें विजयादेवीचें दर्शन सर्वांना आल्हाददायक होईल–दिवे लागले–कोणी तरी आलेंच–कोण बरें ?–हा दंडकेश्वर–दोन दासींच्या खांद्यावर हात ठेवून देवीच्याच दर्शनाला येत आहे–आळसेश्वराचा जयजयकार असो–असें याचें दंडकेश्वर. [ दंडकेश्वर व दोन दासी येतात.

दंड०—आळसेश्वर ह्मण–ही तोरणें, ह्या विजयपताका–हा दीपोत्सव पाहून मी अगदीं खूप झालों आहें–आळसांत लोळत पडावें तर असल्या मंदिरांत लोळत पडावें असें मला वाटतें–मला राहण्यालायक एखादें मंदिर अयोध्यानगरींत आहे काय म्हणून भटकत फिरायला निघालों तों ह्या पहिल्याच मंदिरांतून चंदनाचा सुवास निघाला–फुलांच्या मालांची काय ही शोभा, काय घमघमाट, काय नाजुकपणा–आळसाचा कैफ असल्या सुवासिक

द्रव्यामुळें उत्पन्न होतो-मलयगिरीवरील चंदनी शीतल वाऱ्याची झुळुक येथें खेळत आहेसें मला वाटतें-हा दीपोत्सव पाहिला म्हणजे सर्व चांदण्या पृथ्वीवर उतरून माझ्या सभोंवतीं खेंचून उभ्या आहेत, आणि सेवा करूं का म्हणून मला विचारीत आहेत असा भास होतो-करूं द्या त्यांना माझी शुश्रूषा-दासीनों, तो पुलांचा ढीग पहा-फुलांची शय्या येथें तयार करा, आणि त्यांवर लोळणाऱ्या ह्या दंडकेश्वराची-नव्हे आळसेश्वराची शुश्रूषा विश्वांतील सर्व चमकणाऱ्या चांदण्यांना करूं द्या—

दासी०—विजयादेवी ह्या येथें उभ्या आहेत; त्यांना अगोदर विचाराल ना, हा दीपोत्सव कशासाठीं म्हणून ?

दंड०—मला काय करायचें आहे विचारून ? पाडवा म्हणून दीपोत्सव करा किंवा दिवाळी म्हणून गुढ्यातोरणें उभारा, मला विचारपूस कशाला ? कशासाठी कां असेना-आयतें सुख आलें आहे, मौज मारावी, चैनींत असावें, आणि आळसाच्या धुंदीत लोळत पडावें, हें आळश्यांचें जीवित.—दासीनों, फुलांच्या शय्येवर मी लोळत पडल्यावर गोड मधाची धार माझ्या मुखांत धरा, मग पाहिजे तर तो मध हिमाचलांतील पुष्पांचा आहे, का गंगायमुनाकांठच्या फुलांचा आहे, का विंध्याचलांतील मोहराचा आहे, का मलयगिरीवरच्या कळ्यांचा आहे, हें माझी जीभ मिटक्या मारीत मारीत तुह्मांला सांगत राहील.

विज०—पण आमच्या मंदिरांत तुह्मी आलां आहां; तेव्हां प्रथम हा दीपोत्सव कां केला आहे हें तुह्मीं मजपासून ऐकून घेतलें पाहिजे.

दंड०—ही कटकट मला नको-दासीनों, कोठें मधुर वाद्यें वाजूं लागलीं ह्मणजे माझे कान उघडे ठेवा, नाहीं तर मऊ कळ्यांच्या गुड्या एकदम माझ्या कानांत घाला—

विज०—पण मी सांगतें तुह्माला हा उत्सव कशासाठीं आहे तें-उदईक पुष्य नक्षत्राचे योगावर—

[ पडद्यांत दवंडी—ऐका, अयोध्येचे सर्व नागरिकहो ऐका, उदईक सकाळीं पुष्य नक्षत्राचे योगावर युवराज देव रामचंद्र ह्यांना राज्याभिषेक करण्याचें राजसभेच्या संमतीनें दशरथ महाराजांनी ठरविलें असून, वसिष्ठ गुरूंची सर्व पौरजनांना अशी आज्ञा आहे की, राज्याभिषेकाच्या महोत्सवासाठीं अयोध्या नगरीनें आतां दीपोत्सव करावा, अंगणांतून व रस्त्यांतून सुगंधित द्रव्यांचें सिंचन करण्यांत यावें, तोरणें व विजयपताका चोहोंकडे उभारण्यांत याव्या, सर्वांनी आपली मंदिरें शृंगारावींत, आणि राज्याभिषेकानंतर राजसभेंत अयोध्येच्या सिंहासनावर बसणाऱ्या महाराजा रामचंद्राचे दर्शनाला मोठ्या सणाप्रमाणें वस्त्रालंकार घालून सर्व स्त्रीपुरुषांनी अवश्य यावें.]

दंड०—उद्यां रामाला ना राज्याभिषेक होणार? होय ना, होय ना ?

विज०— उद्यांपासून महाराज रामचंद्र सिंहासनावर बसणार; महद्भाग्य आमचें ह्मणून आह्माला हा राज्याभिषेक पहावयाला मिळणार !

दंड०—मग मला उद्यां मंत्रिपद मिळायला काय हरकत? तुह्मीं आळशी आहां, तुमच्या हातून काम होणार नाहीं, असें मला इतक्या दिवस सांगण्यांत येत असे; उद्यां रामराज्यांत ही सबब चालणार नाहीं.

विज०—उद्यांपासून तुह्मी हि पराक्रमी होणार काय ?

दंड०—रामराज्यांत मंत्री व्हावयाला पराक्रम कशाला पाहिजे ?—रामराज्य ह्मणजे आळशाचें राज्य.—मंत्र्यांनीं कांही करायला नको, प्रजेनें कांहीं करायला नको, सैन्यानें कांही करायला नको.—एकबाणी राम आहे, सैन्याची जरुरी काय ? रामाचा बाण लढत राहील, शत्रूंना मारुन टाकील, आळसांत लोळत राहून चैन करणें एवढाच धंदा अयोध्येच्या चतुरंग सेनेला उरणार !—एकवचनी राम आहे; मंत्र्यांनीं विचार तरी कशाला करायला पाहिजे आणि मंत्र्यांची सल्लामसलत तरी कशाला पाहिजे ?—एकपत्नी राम आहे; कोणी कोणाला वांकड्या नजरेनें पहाणारच नाहीं.—असला राजा मिळाल्यावर• मजसारख्या आळशाला मुख्य मंत्री नेमलें म्हणून राज्याचें काय नुकसान होणार ? बिनतक्रार मला मुख्य मंत्री नेमण्याची हीच वेळ—

उदईक पुष्य नक्षत्राचे योगावर युवराज राम सिंहासनावर बसणार आणि हा आळशी मुख्य मंत्री होणार-दासींनों,करा ग माझ्या नावाचा जयजयकार—

**दो० दा०**—मुख्य मंत्री दंडकेश्वर यांचा जयजयकार असो, मुख्य मंत्री दंडकेश्वर यांचा जयजयकार असो, मुख्य मंत्री— [ मंथरा येते.

**मंथ०**—कोणी केलें यांना मुख्य मंत्री ?

**दंड०**—कोणी नाहीं; मीच झालों-आळसाचा हा प्रसाद आहे-मीच मला मंत्री करतों, मीच मला राजा करितों-मीच माझा अवतार होतों—

**विज०**—पाहिलेंत मंथराबाई, असल्या खुळचटांना का कोण मंत्री नेमणार ?-मंथराबाई, तुमची राणी कैकेयी अश्वपतीची कन्या; अश्वपालाच्या देशांत सर्वांना सारथ्याचें काम येतें ह्मणतात; तेथील बायका घोडे घासण्यांत फार प्रवीण असून, मीं ऐकलें होतें मंथराबाई तर खरारा करकरून गाढवालाहि घोडा बनविण्यांत तरबेज आहेत ह्मणून-पण ह्या-ह्या—

**दंड०**—ऐक, ऐक, मंथेर, सुमंत्र मंत्र्याची ही राणी विजया तुझ्या ह्या नवऱ्याला गाढव ह्मणत आहे-वाईट वाटून घेऊं नकोस-आळशावर कोणत्याच शिवीचा कांहींच परिणाम होत नाहीं, हें हिला कोठें ठाऊक आहे ?-काळजी करूं नकोस, ही विजया मला गाढव ह्मणत असली तरी आळस सोडून उगीच तडफडून गाढवाप्रमाणें दुगाण्या झाडण्याचा उद्योग मी कसा करीन?

**विज०**—झाडा ना दुगाण्या, तुमच्या हातून आतां काय होणार ?-कैकेयीचा देश अश्वपालांचा नसून अचरट गर्दभांचा आहे; असें उद्यांपासून सर्व लोक ह्या ध्यानाकडे बोट दाखवून ह्मणूं लागतील.-आमचें मंत्रिपद काढून घेऊन ह्या ध्यानाला महाराजांचा सारथी ह्मणून रथावर बसविणार होतां नव्हे ?-एहेरे ध्यान-बायकोच्या आड कशाला लपता ?-एहेरे ध्यान !

**दंड०**—बायको ह्मणजे आळशी पुरुषांची ढाल होय.

**मंथ०**—असें काय बडबडता ?-अशानें सारथी कमे होणार-उगीच बडबड नको-



विज०—एहेरे ध्यान–बायकोच्या आड कशाला लपता ? [पृ. २०

**दंड०**—आळशाचे सर्व अवयव मरून जातात, पण जिभेंत मात्र जीव शिल्लक राहतो–मंथरे, माझ्या बडबडण्यानें तूं घाबरूं नकोस–उदईक पुष्य नक्षत्राचे योगावर मी मुख्य मंत्री झालोंच म्हणून समज.–सुमंत्र मंत्र्यासारखा–ह्या विजयादेवीच्या यजमानासारखा सारथ्याचें काम करणारा मंत्री मी होऊं इच्छीत नाहीं,–घोडेघास्या मंत्री कोणी व्हावें ?–मुख्य मंत्र्याला बडबड करावी लागते; आणि ती बडबड सर्व आळशांना करतां येते–दशरथ महाराजांना माझी किंमत समजली नाहीं तरी उद्यांपासून सुरू होणाऱ्या रामराज्यांत—-

**मंथ०**—रामराज्यांत ?–रामराज्यांत–रामराज्यांत—

**दंड०**—रामराज्यांत मला कोणीहि गाढव म्हणणार नाहीं–उदईक पुष्य नक्षत्राचे योगावर युवराज देव रामचंद्र यांना राज्याभिषेक व्हावयाचा असून— [ पडद्यांत दवंडी पूर्वोक्त.

**मंथ०**—रामाला उद्यां अभिषेक–राजसभेंत हें ठरलें–उद्यांपासून राजराज्य—

**विज०**—हो, हो, उद्यांपासून रामराज्य, राजसभेंत हेंच ठरलें–कैकेयीचे दिवस संपले; मंथराबाई, मंत्रिपद तुमच्या यजमानांना मिळून माझी बरोबरी करण्याचा नाद द्या आतां सोडून.

**दंड०**—मुख्य मंत्रीण होग तूं–राजकाजांत गाढवाचा तेव्हांच घोडा होतो आणि रामराज्यांत तर—

**विज०**—रामराज्य असो का दशरथराज्य असो, गाढव तें गाढवच–कां मंथराबाई, रागावलां–निघून कां अशा जातां !

**दंड०**—अशी रागावून जाऊं नकोस–मी सुमंत्र मंत्र्याचा मत्सर करण्याचें सोडून दिलें आहे; तूंहि विजयादेवीचा मत्सर करूं नकोस–मी मुख्य मंत्री होणार–सारथ्याचे जागेकरितां आतां कशाला सवतीसारख्या भांडतां !

**मंथ०**—ही कसली आली आहे माझी सवत.–अयोध्येचीं सर्व राज्यसूत्रें आज माझ्या मुठींत आहेत–ही कसली आहे माझी सवत— [ जाते.

**विज०**—मंथ्याची राणी ह्मणे ह्या दासीचा मत्सर करणार—खरोखरच तुह्मी गाढव आहां—मंथ्याच्या राणीला आपल्या दासीची सवत ह्मणायला लाज नाहीं वाटली ? [ जाते.

**दंड०**—दासीनों, खरोखरच मी गाढव झालों काय ? पहा नीट—कानबीन एकदम लांबले नाहीत ना ?—नीट तपासा—उपटूं नका—लांबले नाहींत ना ?—आखूडच आहेत ना ?

**दो० दा०**—लांबले नाहींत; आहेत तेवढेच आहेत.

**दंड०**—मग हरकत नाहीं—भांडखोर बायकांच्या तावडीत सांपडलें ह्मणजे पुरुषांचे कान खरोखरच केव्हां केव्हां लांब होतात—आहेत, आखूड आहेत—लांबले नाहीत—विजयादेवी रागारागानें आपल्या मंदिरांत निघून गेली—माझी जीभ लांबून माझ्या बायकोची सवत माझ्या जिभेनें तिला ह्मटलें—रामराज्यांत उद्यां ती विसरून जाईल—दासीनों, आतां असें करा, त्या फुलांची शय्या करून येथेंच पटांगणांत मला नीट निजवा, आणि उद्यांक महाराज रामचंद्र सिंहासनावर बसून मुख्य मंथ्याचीं वस्त्रें त्यांनी मजकडे पाठविल्यावर राजवाड्यांतील स्तुतिपाठकांनी गोड गाऊन मला जागा करीपर्यंत कोणालाहि माझी झोंपमोड करूं देऊं नका—चला, त्या फुलांच्या राशीकडे. [ जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[ कैकेयीचा महाल. कैकेयी पलंगावर निजली आहे; असा देखावा.
मंथरा प्रवेश करिते. ]

**मंथ०**—( स्वगत ) हिला ह्यावेळीं झोंप ! विलासी थाटमाट करून दशरथाची वाट पहात, सर्व दागिने अंगावर घालून कशी सजली आहे—मृत्यूच्या मुखांत पडतांना देखील विलासी सुंदरी आरशांत रूप पाहून सजावट नीटनेटकी करण्याला विसरत नाहींत, ह्मणून ह्मणतात तें खोटें

नव्हे.–हिचा स्वभाव विलासी, दशरथ गोडबोल्या स्त्रीलंपट–माझा मंत्र हिच्या कानांत मीं फुंकला आणि तो स्त्रीलंपट हिचे पाय धरून गोड गोड बोलूं लागला–विलासी स्वभावाला बळी पडून दशरथाला ही वश झाली तर–नशीब अश्वगालाच्या देशाचें, नशीब भरताचें, नशीब ह्या मंथरेचें.– पण मंत्र कानांत फुंकलाच पाहिजे.–सौंदर्याशिवाय मला तर येथें कांहीं किंमत नाहीं, आणि सौंदर्य व आडवी तिडवी ममलत यांचें वाकडें !–पण मीहि सुंदर आहें–माझ्या बुद्धीचा थोडासा अंश तरी कैकेयींत कां असूं नये ?– सुंदर बायकांना पुरुष बुद्धिहीन समजतात पण ह्या मंथरेनें तसें कां मानावें ?– आज नवा श्रृंगार ह्या मंदिरांत इतक्यांतल्या इतक्यांत हिनें कसा केला ?– श्रृंगाराची हौस माझा डाव फसवील काय ?–दैवाची परीक्षा पाहिलीच पाहिजे–( उघड ) कैकेयी, कैकयी, अग कैकेयी, जागी हो, आणि–कसली ही झोप–काळझोप ह्यावेळीं कोठून आली तुला ?–मृत्यूच्या जबड्यांत सांपडली आहेस, कैकेयी, जागी हो, कैकयी जागी हो–( कैकयी जागी होते ) अशी वेड्यासारखी काय पहाते आहेस ?–पुरती जागी झालीस का ?

कैके०—महाराज कोठें आहेत ?–आपल्या बाहुपाशांत प्रेमानें मला धरून, लाडके कां रुसलीस म्हणून महाराज मला लाडिकपणानें विचारीत होते, आणि बघ मला कांहीं उत्तरच देतां येईना–मी अगदीं गोंधळून गेलें आणि उगीचच्या उगीच रुसलें म्हणून लाजलेंहि ! पोरवय ग पोरवय म्हणून महाराजांनीं माझी थट्टा केली, आणि मी रुसून कां बसलें हें तुला विचारावें असें माझ्या मनांत आलें तों तूं माझ्यापुढें उभी !–पण महाराज कोठें गेले ?

मंथ०—कैकेयी, स्वप्नांत आहेस का जागी आहेस ?–नीट शुद्धीवर आलीस ना ?

कैके०—स्वप्नच ग स्वप्न–पण तसल्या गोड स्वप्नांतून तूं मला कां जागी केलेंस ?

मंथ०—जागी करूं नको तर काय करूं?—भलत्याच वेळीं अशीं लडिवाळ स्वप्नें तुला कशीं पडतात?—तुझा अल्लडपणा, कैकेयी, तुला मृत्यूच्या डोहांत लोटून देत आहे, सावध हो, कैकेयी, सावध हो.—असें काय मजकडे खुळ्यासारखें पहातेस—तूं, मी, तुझा भरत, अश्वपतीचा कैकेय देश, अयोध्या नगरींतील तुझ्या माहेरचे सर्व अभिमानी—सर्वच सर्व संकटांत बुडत आहेत—कैकेयी, तुझी प्रतिष्ठा संपली—तूं रुसलीस तर तुला आतां कोण विचारणार?—तुझ्या सवतीच्या—कौसल्येच्या पायांतलें खेटर होऊन तुला ह्यापुढें दिवस काढावे लागणार—बुडालीस, कैकेयी, सपशेल बुडालीस—ज्या महाराजांना चंदनवृक्ष म्हणून कवटाळलेंस तो विषवृक्ष ठरला, आणि आपल्या अंगांतील जालीम विषाचा पेला तुला पाजण्याकरितां तो कपटी गोडबोल्या इतक्यांत तुझ्या मंदिराकडे येणार आहे—सावध हो कैकेयी, सावध हो—विष पिऊन तुझा, तुझ्या भरताचा, तुझ्या आप्तेष्टांचा आणि कैकेय देशाचा नाश करूं नकोस—

कैके०—पण, असें झालें काय तें मला अगोदर सांगशील ना?—महाराज मजपाशीं रत्नें मागून त्या माझ्या भिकारड्या सवतीला देतील, हीच ना भीति?

मंथ०—ही कसली भीति!—कैकेयी, आकाश तुझ्यावर कोसळलें आहे, समुद्र तुला बुडवूं पहात आहे, आणि ही धरित्री आपल्या मातींत तुला मिसळून टाकीत आहे.—तुझीं रत्नें तुझ्यापाशीं महाराजांनीं मागितलीं आणि माझें म्हणणें न ऐकतां कौसल्येच्या भिक्षेच्या झोळींत तीं रत्नें तूं टाकलींस तर त्यामुळें होणारें नुकसान आतांच्या संकटांपुढें कांहींच नाहीं.—ती भिकारडी तुझी सवत श्रीमंत होईल; पण तुझ्या पायावर दासी म्हणून लोळणाऱ्या महालक्ष्मीची वेणीच आतांच्या संकटामुळें तुझ्या सवतीच्या हातीं जाऊन तुझ्या हातीं दारिद्र्याची नरवंटी—

कैके०—असलें कोणचें संकट! सांगशील ना कोणचें संकट तें!

मंथ०—उदईक प्रातःकाळीं अयोध्येचें सिंहासन महाराज सोडून देणार

आणि तुझ्या सवतीच्या मुलाला–भरताच्या शत्रूला–कैकेय देशाच्या मुळावर जन्मास आलेल्या त्या रामाला, कैकेयी राज्याभिषेक होणार—

कैके०—अग ही आनंदाचीच बातमी आहे–रामाला अभिषेक–माझ्या रामाला अभिषेक–सर्वांच्या लाडक्या रामाला अभिषेक–मंथरे, प्रथम ही शुभ बातमी तूं मला सांगितलीस, कोणतें बक्षीस तुला देऊं सांग–मांग ना लवकर कोणतें बक्षीस देऊं तें ?

मंथ०—मूर्ख कपाळकरंटी ! राम–तुझा राम–सर्वांचा लाडका राम राजा झाल्यावर काय होईल तें तुला कळत नाहीं–माझें नशीबच फुटकें–बक्षीस कोणचें देऊं ?–दुर्दैवी मी–तूंहि दुर्दैवी–तुझें दुर्दैव तुला समजत नाहीं–मला समजतें–ह्या माझ्या शरिरांतील ह्या जीवामुळें तुझें आणि माझें दुर्दैव मला समजतें आणि वेदना होऊन डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा वाहतात, त्या माझ्या दुःखी जीवाला कुऱ्हाडीचे दोन घाव माझ्या डोक्यावर घालून ह्या शरिरांतून सोडवून टाक.–कैकेयी, तुझ्या पायावर कैकेय देशच्या दुःखाचा अश्रुधारांनीं अभिषेक करतें आणि तुझ्या हातांनीं माझ्या मानेवर कुऱ्हाडीचे घाव घालून आतांच्या नरकयातनांतून ह्या मंथरेला तू सोडवून टाक–(पाय धरते) दुसरें तिसरें बक्षीस मला नको, मला ठार मार आणि अजागळ स्थितींतच तूं सुखी रहा—

कैके०—ऊठ मंथरे, ऊठ. असें काय करतेस ?–राम राजा झाल्यानें जीव देण्याइतकें दुःख तुला कसें होतें, तें मला समजून सांगशील ना ?–( मंथरा उठते ) कां ग गडे इतकी जिवावर उदार कां झालीस ?–तुझ्या गळ्याची शपथ —

मंथ०—माझ्या गळ्यावर ठेवलेल्या ह्या तुझ्या हातानें माझा गळा दाबून टाक आणि माझा जीव खरोखरच घे—

कैके०—तुझ्या गळ्याची शपथ, तुझ्याइतकी प्रिय मैत्रिण मला कोणी नाहीं,–पूस डोळे आणि सांग मला इतकें दुःख तुला कां होतें तें.

**मंथ०**—कैकेयी, तुझें हित तुला समजत नाहीं, हेंच माझ्या दुःखाचें कारण. कैकेयी, तूं राजकन्या म्हणून जन्मास कां आलीस?–त्रैलोक्यांतील सर्व स्त्रियांहून अधिक सुंदर तूं कां झालीस?–दुसरेपणाच्या नवऱ्याशीं तूं लग्न कां केलेंस?–लक्ष्मी आणि राजसत्ता पायावर लोळत राहिल्याशिवाय अत्यंत लावण्यवती राजकन्येचें जीवित जिवंत सवतींच्या नवऱ्याला वरून कसें सफल होईल?–तुझ्या नशिबानें हाशी नवरा मिळाला, तुझ्या सौंदर्याचें चीज कांहीं तरी झालें; पण लक्ष्मी आणि राजसत्ता जन्मभर पायावर लोळविण्याचा स्त्रियांचा पराक्रम तूं कोठें करून दाखविला आहेस?–कैकेय देशाच्या राजकुळांतील त्रैलोक्यसुंदरीचें जीवित वायां गेलें, असें मी कां समजू नये?

**कैके०**—लक्ष्मी माझ्या पायावर सतत लोळते आहे, म्हणूनच तूं मला आदिशक्तीचा अवतार समजतेस; होय ना?–महाराज माझ्या हातांतलें बाहुलें आहेत–राजसत्ता आज माझ्या पायावर लोटांगणें घालीत आहे–नाहीं कसें?

**मंथ०**—महाराज तुला फसवीत आहेत–तुझ्या सौंदर्यावर दशरथ खूष होता, तुझे लाड पाहिजे तसे पुरविले गेले–पण आतां काय?

**कैके०**—अजून महाराज माझ्या मुठींत आहेत–अयोध्येच्या सिंहासनाची खरी सत्ता माझ्या मुठींत आहे–मी फसलें नाहीं आणि फसणार नाहीं–कैकेय देशाची ही राजकन्या कैकेयी स्त्रीलंपटाचें नुसतें खेळणें झाली नाहीं व होणारहि नाहीं.–राजकन्येचा पराक्रम मीं गाजविला आहे, गाजवीत आहे, आणि आमरण गाजविणार आहे—

**मंथ०**—अहा ग राजकन्या! कसला आला आहे तुझा पराक्रम!–पराक्रमाचें मुख्य साधन द्रव्य आणि सत्ता–आपलें शस्त्र खालीं ठेवणारा कोणचा प्राणी पराक्रमी होऊं शकतो?

**कैके०**—मी कोणता पराक्रम गाजविला नाहीं?–दुसरेपणाची बायको, पहिली जीवंत सवत, आणि दुसऱ्याहि सवतीशीं महाराजांनीं लग्न केलें,

वडील सवत असतांहि मी पट्टराणी आहें, तिसरी नवी बायको केली तरी माझ्याच मोहिनीत महाराज कायमचे गुरफटलेले आहेत!

**मंथ०**—हा सौंदर्याचा पराक्रम, राजकन्येचा नव्हे.

**कैके०**—पराक्रम राजकन्येचा आहे-सौंदर्य नुसतें साधन-महाराज स्त्रीलंपट म्हणून नुसत्या सौंदर्यावर माझें भागलें; पण ही कैकेयी सारथ्याच्या जागीं बसून रणांगणावर घोड्यांना पाहिजे तसें धावावयाला लावण्यांत जशी कुशल आहे, तशीच सिंहासनावर पट्टराणी म्हणून बसून राजसत्तेचीं सूत्रें पाहिजे तशी नाचविण्यांत पटाईत आहे, समजलीस?-पट्टराणीचा पराक्रम मी काय थोडा गाजविला आहे?

**मंथ०**—कोणचा असा पराक्रम?-पराक्रमांचा उच्चार कर म्हणजे तुझा भ्रम तुझ्या लक्षांत येईल.-पट्टराणीचा कोणता पराक्रम करून दाखविला आहेस-सांग ना?

**कैके०**—मधली राणी असतांहि पट्टराणी म्हणून सिंहासनावर बसलें—

**मंथ०**—दशरथ स्त्रीलंपट, त्याचें हें फळ.-राजकन्येचा पराक्रम ह्यांत काय आहे!

**कैके०**—सिंहासनावरून कौसल्येला ओढून काढली, तूं सुंदर नाहींस म्हणून तिच्या तोंडावर बोललें, कौसल्या रुसली असतांना पायांतलीं खेटरें पायांतच राहिलीं पाहिजेत असें तिच्या देखत मी महाराजांना बजावलें! कंगालाप्रमाणें दीनवाण्या स्थितींत नारायणाची आणि अग्नीची पूजाअर्चा करण्यांत दिवस कंठायला मी तिला भाग पाडलें; पावलोपावलीं माझ्या सवतींचा अपमान करून पायाखालीं त्यांना दिमाखानें ठेंचण्यास मी कमी केलें नाहीं. कौसल्येनें अयोध्येंत आणून भरलेल्या कौसल देशांतील सर्व स्त्री-पुरुषांना येथून हांकून देऊन, अयोध्येचें सिंहासन कैकेयीच्या मुठींत आहे हें सर्वांना पटविण्याकरितां कैकेय देशांतील प्रत्येक भिकाऱ्याला अयोध्येंत नवकोट नारायण मी बनविलें! माझ्या सवती रस्त्यांतून चालल्या असतांना इतक्या कळकट दिसतात कीं त्यांची धिंड मी काढीत आहे असें सर्वांना वाटतें-माझ्या मंथरेचीहि सर माझ्या सवतींना नाहीं असें जो तो म्हणतो—

मंथ०—हा सवतीमत्सर होय; ह्यांत पराक्रम कोणता ? नर्तकी देखील लग्नाच्या सवतींचा असा छळ करतात.–सवतींना मनमुराद छळलेंस—नर्तकीहून अधिक काय केलेंस ?–नाचणाऱ्या गाणाऱ्या दासीहून निराळें काय तुझ्या हातून झालें ?

कैके०—नाहीं, मंथरे, तूं मला पुरतेपणीं ओळखलें नाहींस.–मला नटविणाऱ्या सजविणाऱ्या दासीच्या डोळ्यांनीं तूं मजकडे पहातेस; तुला दिसते त्याहून निराळी मी आहे.–आदिशक्तीचा अवतार म्हणून मला ह्मटलेंस–कांहीं बुद्धि तुला आहे असें मला वाटलें,–त्या बुद्धीनें मजकडे पहा ह्मणजे माझा पराक्रम तुला आठवल्यावांचून रहाणार नाहीं.–अग शम्बर दैत्याच्या युद्धांत महाराजांचें सारथ्य कोणी केलें !–दैत्यांच्या असंख्य बाणांनीं जर्जर होऊन महाराजांना जेव्हां रथांत मूर्च्छा आली, तेव्हां रणांगणावर इतक्या कौशल्यानें मी घोडे हांकले कीं, मूर्च्छा आल्यानंतर शत्रूचा एकहि बाण महाराजांना लागला नाहीं. रणांगणावरून मोठ्या चतुराईनें रथ एका बाजूस नेऊन महाराजांचे प्राण वांचविले; त्यावेळीं आकाशांतून देवांनीं माझ्या मस्तकावर पुष्पवृष्टि केली आणि माझ्या नांवाचा जयजयकार केला.–महाराजांना सावध करून रथ पुन्हां मी शम्बर दैत्याच्या समोर उभा केला–महाराज शरसंधान करूं लागलें तों कण्यांतून एक चाक निसटूं लागलें–डाव्या हातानें घोडे हांकले, ह्या उजव्या हातानें चाक कण्यांत दाबून कण्याचें बाहेरचें तोंड घट्ट धरून ठेवलें, आणि शंबर दैत्याचें शिर आतां उडवा असा इषारा माझ्या नजरेनें मी महाराजांना दिला ! शंबर दैत्य मरून पडल्यावर देवांनीं प्रथम माझा जयजयकार केला, आकाशांतील अप्सरांनीं प्रथम माझ्या मस्तकावर फुलें उधळलीं, ऋषींनीं प्रथम माझीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं–मंथरे, तेव्हांपासून अयोध्येच्या राज्यांत मी प्रथम आणि महाराज मागाहून अशी स्थिति आहे.–सौंदर्याचीहि मला फारशी किंमत नाहीं–आयतें आहे सौंदर्य, विलासांत महाराजांना मनासारखें खेळविण्यास त्रास पडत नाहीं, इतकेंच–अयोध्येंत पराक्रमी राजकन्या म्हणून मी मिरवत आहे, सुंदर तरुणी म्हणून ही कैकेयी चमकत नाहीं, समजलीस ?

**मंथ०**—पण तें मिरवणें उद्यांपासून तूं विसरलें पाहिजेस—राम सिंहासनावर बसल्यावर तुला कोण विचारणार ?

**कैके०**—मला कोण विचारणार ! राम माझ्याविरुद्ध थोडाच जाणार आहे ? रामराज्यांतहि ह्या कैकेयीच्या पराक्रमाचें तेज पूर्वीच्यासारखेंच चमकत राहील. पेटलेल्या अग्नीच्या ज्वाळा नेहमीच तेजस्वी असतात—रखरखलेल्या निखाऱ्यांना कोणीच लाथाडूं शकत नाहीं—रामराज्यांत कौसल्या जर माझ्या वाटेस गेली तर तिचे हातपाय पोळल्यावांचून राहणार नाहींत.

**मंथ०**—रखरखलेले निखारे !—उद्यां तूं विझालेले निखारे होणार—कोळशाला कोण विचारतो ?—तुझ्या गालांच्या कमळावर कोळसे उगाळून काळा कुळकुळीत लेप देण्यांत येईल—महाराजांनीं सिंहासन सोडलें ह्मणजे चतुर्थाश्रमाची तयारी महाराज करूं लागणार—संन्याशीण होऊन महाराजांबरोबर तुला वनांत राहतां येत नाहीं, कारण बायकांना संन्यास नाहीं—मग राजमाता कौसल्या तुझ्यावर सूड उगविल्याशिवाय कशी राहील ? पायांतील खेटरें पायांतच ठेविलीं पाहिजेत ह्मणून कौसल्या रामाला उपदेश करील—कोळशाची काळी पूड तूं उद्यां होणार—कैकेयी, कोसल देशांतील लोकांना तूं जसें अयोध्येंतून हांकून लावलेंस—तुझ्या सर्व कैवाऱ्यांची संपत्ति हिरावून घेऊन आह्मां सर्वांना कैकेय देशाकडे हांकून देण्यांत येईल, समजलीस ?—मग तूं काय करशील ? महाराज वनांत निघून गेल्यावर राम तुझें ऐकणार का कौसल्येचें ऐकणार ?

**कैके०**—रामानें आपल्या आईचें ऐकलें—हो माझें न ऐकतां आईचें ऐकलें, मी—मी—मी—

**मंथ०**—गोंधळलीस कां ?—काय करणार ?—करणार काय—रडत बसणार—दुसरें काय ?—माझ्या यजमानांना कौसल्येच्या दासींनीं आतां नुकतेंच गाढव ह्मटलें—अग, राम राजा होणार हें ऐकल्याबरोबर आजच—आतांच—त्या मेल्या दासींनीं मला किती शिव्याशाप दिले—कसें बोचून बोचून टाकून घालून बोलल्या—नको जीव असें मला झालें आहे—कैकेयी, आज जें माझें

झालें, तेंच उद्यां तुझें होईल-कसें ग, कैकेयी, तूं तें सहन करशील ?-हृदयाला घर पडेल असें टोचून चुरु चुरु बोलतात त्या मेल्या-

कैके०—काय बोलल्या-तुला काय ह्मणाल्या—

मंथ०—दंडकेश्वराला गाढव करून, कैकेयीची कोळशाची गोणी एका बाजूला-मंथरेचा उकिरडा दुसऱ्या बाजूला-आणि भरत लोणारी म्हणून तें गाढव कैकेय देशाकडे हांकून नेत आहे-अशी तुमची धिंड अयोध्येंत काढूं-असें बोलल्या-त्या धिंडेचें चित्र डोळ्यापुढें उभें राहिलें ह्मणजे-कैकेयी, तुझा पराक्रम अस्तास गेला ग अस्तास गेला-उद्यां तूं कोळसा होणार, मी उकिरडा ठरणार आणि तुझ्या पोटीं जन्मास आलेला विष्णूचा अवतार तुझा भरत गाढवें हांकणारा लोणारी-नाहीं ग माझ्यानें बोलवत नाहीं-बुडालीस ग बुडालीस, कैकेयी, रसातळास गेलीस-साफ बुडालीस-

कैके०—उद्यांचे संकट तर खरें, पण मंथरे, इतकें भिण्याचें आणि इतकें गांगरून जाण्याचें कांहीं कारण नाहीं,-महाराज तपोवनांत गेल्यावर कौसल्येच्या नादीं लागून आम्हावर सूड उगवावा असें रामाला कदाचित्—

मंथ०—कदाचित् काय-खात्रीनें-सापाच्या शेपटीवर पाय ठेवून इतक्या दिवस दिमाखानें नाचलीस-रघुकुलाचें सामर्थ्य उद्यां त्या सापाच्या अंगांत संचारल्यावर तो साप उलटून चावल्याशिवाय कसा राहील ?

कैके०—पण तसें चिन्ह दिसूं लागतांच, माझ्या खजिन्यांतील विश्वाची संपत्ति रथांत घालून, मी स्वतः सारथी होऊन, कैकेय देशांत निघून जाईन,-कंगाल झालेल्या अयोध्येचें नाक ठेचण्याकरितां भरताकडून कैकेय देशांत अश्वमेध यज्ञ मी करवीन, आणि माझा मुलगा विष्णूचा खरा अवतार असें सर्व राजांना व ऋषींना बोलायला मी लावीन.-मंथरे, तूं कां काळजी करतेस ? राजकन्या कैकेयी पराक्रमा आहे बरें पराक्रमी आहे-दोनदां देवांनीं प्रथम माझ्यावर पुष्पवृष्टि करून महाराजांच्या देखत माझी अग्रपूजा केली आहे, तशीच वेळ आली तर माझ्या अश्वमेधाच्यावेळीं रामाच्या देखत माझी अग्रपूजा देवांना तिसऱ्यांदा करावी लागेल-काळजी करूं नकोस, तुझी कैकेयी पराक्रमी आहे बरें पराक्रमी आहे.

मंथ०—पराक्रमी आहेस तूं—पण थोडी खुळी आहेस—व्यवहार तुला समजत नाहीं—अग कैकेयी, तुला अश्वमेध कोण करूं देणार ? तुझी संपत्ति तूं कोणाच्या जिवावर अयोध्येंतून हालविणार ?—तसें तूं करूं लागलीस ह्मणजे विश्वामित्रानें रामलक्ष्मणांना दिलेली अस्त्रें स्वस्थ कशी बसतील ?—तुझा भरत रामलक्ष्मणांच्या तोडीचा योद्धा नाहीं—तशीच वेळ आली तर तुझा, तुझ्या कैकेय देशाचा आणि तुझ्या भरताचा विध्वंस क्षणांत रामलक्ष्मणांचे बाण करून टाकतील.—विलासांच्या नादानें झोंपी जाणारे शक्तिहीन होतात—रामलक्ष्मणांच्या बाणापुढें तुझ्या भरताचें धनुष्य व तुझें सारथ्य कवडीच्याहि मोलाचें नाहीं.—तुझी संपत्ति आज कोठें आहे ? अयोध्येंतच आहे ना !—राम सिंहासनावर बसल्यावर अयोध्येच्या हरएक नव्हे या लक्ष्मीचा मालक तो होणार—राजा लक्ष्मीचा मालक, इतर रखवालदार—नव्हे ग उद्यां सकाळपासून तुझ्या अंगावरील फुटका मणिहि तुझ्या मालकीचा नव्हे—भिकारणीहि आपल्या झोळीतलें मूठभर धान्य आपल्या मुलाच्याच हातीं जाईल अशी खबरदारी घेतात—मोलकरणीहि आपल्या हातापायांतलि शक्ति आपल्या मुलाच्याच अंगांत संचारेल अशी काळजी वहातात—घराण्याचा पैसा, घराण्याची विद्या आणि घराण्याचा लौकिक, हीं सर्व पराक्रमाची साधनें आपल्या मुलांच्याच कबज्यांत कशीं जातील म्हणून सर्व माता रात्रंदिवस तळमळत असतात,—तूं विलासांत दंग होऊन राहिलीस, रामलक्ष्मण शस्त्रास्त्रसंपन्न झाले आणि तुझा भरत अश्वपालाच्या देशांत घोडे घाशीत राहिल !—तूं नट्टयापट्टयांत गुंग होऊन राहिलीस, रघुवंशाचा लौकीक रामाला मिळून भरताला राज्याभिषेकाचें आमंत्रणहि नाहीं आणि तुला राजसभेंत काय ठरलें ह्याची वार्ताहि कोणी सांगितली नाहीं!—पूर्वीच्या पराक्रमांत मग्न होऊन आतां बसली आहेस, तुझ्या नशिबीं कारागृहवास येऊन तुझी संपत्ति उद्यां रामाची बटीक झाल्यावांचून राहणार नाहीं—सांग कैकेयी, ह्या संकटांतून तूं कशी पार पडणार ?—सांग ना ? आहे कांहीं तोड ?—कांहीं नाहीं—नाहींच कांहीं—बुडालीस ग कैकेयी, रसातळास गेलीस—भरताचा घात झाला ग घात झाला—

कैके०—मला किं नाहीं इतकें पुढचें दिसलें नाहीं—

मंथ०—झाला ना तुझा घात, फसलीस ना तूं, बुडालाना तुझा भरत ?

कैके०—झालें खरें असें—पण आतां काय करायचें—जें नशिबीं असेल तें सोसलें पाहिजे—फसलें ग फसलें; मंथरे, माझ्या मुलाचा घात माझ्या डोळ्यांनीं पाहण्याची पाळी मजवर आली—महाराजांनींच माझा गळा केसानें कापला—कोण मला वांचविणार ?—मंथरे, तूं चाणाक्ष आहेस, माझ्याहून तुला अधिक समजतें, सुचतो का कांहीं उपाय तुझ्या बुद्धीला ?—घात झाला ग माझ्या भरताचा सर्वस्वीं घात झाला—माझ्या सवतींनीं डांव साधला ग डांव साधला—सुचतो का कांहीं उपाय ?—ह्या कपाळकरंट्या कैकेयीच्या पोटीं येऊन भरताचा नाश झाला ग नाश झाला—सुचतो का कांहीं उपाय ?—नसेल सुचत तर मला थोडें विष पाज आणि रामाच्या राज्याभिषेकाच्या मिरवणुकीबरोबरच माझी प्रेतयात्रा निघूं द्या—मंथरे, सुचतो का कांहीं तुला उपाय ?

मंथ०—उपाय सुचतो—नाहीं असें नाहीं—तुला सगळें कळतें पण वळत नाहीं—मी काय करूं त्याला ?

कैके०—सांग ना कोणता उपाय सुचतो तो ?

मंथ०—कैकेयी, तूं पराक्रमी आहेस—पण तुझा निश्चय टिकत नाहीं—निश्चय नसेल तर पाय घसरून प्राणांना मुकावें लागतें—उपाय सुचविला तर त्याप्रमाणें निश्चयानें वागशील ना ?

कैके०—सांग लवकर कोणता उपाय तो.

मंथ०—अग तुझ्या हातांत उपाय आहे—कडेवर कळसा आणि गांवाला वळसा, अशी तुझी स्थिति भांबावल्यामुळें झाली आहे—शम्बर दैत्याच्या वेळचा तुझा पराक्रम तुला आठवतो ना ?

कैके०—न आठवायला काय झालें ? तो पराक्रम तर आतां माझ्या अंगांत संचारला आहे.—पण त्याचें काय ह्यावेळीं ? रामलक्ष्मणांच्या बाणांपुढें मी आणि भरत लुल्यापांगळ्यासारखे आहोंत—ह्या लुलेपणावर कांहीं तोड आहे का ?

**मंथ०**—अग त्या वेळीं तुला महाराजांनीं दोन वर दिले आहेत, त्यांची आठवण आहे ना?—तूं लुली नाहींस, तुझा भरत पांगळा नाहीं, ते दोन वर दशरथापाशीं आतांच्या आतां माग आणि अयोध्येच्या समृद्ध राज्याचा मालक भरताला कर.

**कैके०**—हो ग हो, बरी आठवण केलीस त्या वरांची—आजपर्यंत कीं नाहीं माझ्या मनांत कांहीं येण्याच्या अगोदरच महाराजांनीं माझी हौस पुरविली नाहीं असें कधींच झालें नाहीं; त्यामुळें त्या वरांची मला आठवण झाली नाहीं.—कसें म्हणतेस, ते वर आतांच्या आतां मागून घेऊं?

**मंथ०**—हो आतां वर मागून घे—

**कैके०**—कसे कसे मागूं?

**मंथ०**—एक वरानें भरताला सिंहासन—

**कैके०**—हां बरोबर—शहाणी आहेस ग तूं—चतुर आहेस—

**मंथ०**—आणि दुसऱ्या वरानें पुष्यनक्षत्राचेच योगावर रामाला वनवास—

**कैके०**—वनवास कशाला रामाला?—माझा भरत सिंहासनावर बसल्यावर राहीना राम अयोध्येंत निर्माल्यासारखा.

**मंथ०**—तुला कळत नाहीं तें हेंच—धनुर्धर राम निर्माल्य होऊं शकत नाहीं—भरत त्याच्याच तोडीचा धनुर्धर होईतों रामानें वनवासांतच दिवस कंटले पाहिजेत—

**कैके०**—हो, हेंहि बरोबर आहे.—माझें कल्याण तूं आज केलेस—तुझ्यावर पुष्पवृष्टि करूं, का मोती उधळूं, का रत्नांचा वर्षाव करूं—काय करूं सांग—कोणतें बक्षीस पाहिजे तें बोल?

**मंथ०**—कांहीं बक्षीस मला नको—वर मागतांना रामासंबंधानें मनाला पाझर फुटूं देऊं नकोस ह्मणजे मला सर्व कांहीं मिळालें—त्या मेल्या रामाला—

**कैके०**—रामाला नुसतें ह्मण, मेल्या नको ग ह्मणूं त्याला—

**मंथ०**—मला तुझें भय वाटतें तें हेंच—तूं वर मागत असतांना महाराज,

माझा राम माझा राम, ह्मणून गयाव्या करूं लागले ह्मणजे तूंहि द्रवून जाशील आणि मी मात्र तोंडघशीं पडेन—

कैके०—तसें कांहीं व्हायचें नाहीं–मीं दृढ निश्चय केला आहे–मी फसायची नाहीं–मला सगळें समजतें आहे—

मंथ०—आतां नीट डोळे उघडले ना तुझे?–माझें ह्मणणें तुला पटलें ना? रामाबद्दलचा भ्रम दूर झाला ना? माझ्या सांगण्याप्रमाणें वागणार ना?

कै.के०—आतां मला सगळें आटवूं लागलें आहे, आतां मी चुकायची नाहीं–अगदी तूं ह्मणतेस तसें तंतोतंत वागतें.

मंथ०—तूं आतां रसून बैस–अंगावरचे दागिने फेंकून संतापानें जमिनीवर पडून रहा–चल तुझ्या रसून बसण्याच्या मंदिरांत चल, तेथें तुला मी नीट पुन्हा सर्व समजावून सागतें आणि महाराज आल्यावर—

कैके०—पण गडे मंथरे, रामाच्या अभिषेकाच्या तयारींत महाराज गुंतून राहून, अग, राम, माझा राम, माझा लाडका राम, ह्मणतच महाराजांचा वेळ निघून जाईल आणि अभिषेकापूर्वी मजकडे यायची आटवणच महाराजांना व्हायची नाहीं. अग रामनामाचा महिमाच तसा आहे; ह्मणून ह्मणतें—

मंथ०—भलत्या शंका घेऊन निश्चयाला ढळूं देऊं नकोस–चल माझ्याबरोबर रसून बसायला–तूं रसून बसली आहेस असा गवगवा महाराजांच्या कानीं मी घालतें–त्यांनीं रामनामाचा जप घेतला तर उलटीं अक्षरें करून 'मरा'–'मरा' असा मंत्र माझ्या अन्तःकरणांत उमटत राहील आणि तुझें सावज वेळींच तुझ्या जाळ्यांत येऊन पडेल–तूं मात्र सावध रहा ह्मणजे तुझा जय झालाच ह्मणून समज. चल रसून बसायला.

पडदा.

## पहिला अंक समाप्त.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ कौसल्येचा महाल—दोन दासी प्रवेश करितात. ]

प. दा०—इतकी कसलीग घाई सामानसुमानांची चालली आहे ? ह्या वेळीं कसलेंग होमहवन ?

दु. दा०—कसलें ह्मणून काय विचारतेस ?—अर्धी रात्र तर निघून गेली, आणि बाकी राहिलेल्या अर्ध्या रात्रीतच सर्व होमहवन आटोपलें पाहिजे. प्रातःकाळी देव रामचंद्र सिंहासनावर बसण्यापूर्वी, दीक्षा घेऊन होम-हवनांत व श्री नारायणाचे ध्यानांत दोन प्रहर तरी रामचंद्रांनीं घालविले पाहिजेत, असें महाराजांनीं व वसिष्ठगुरूंनी ठरविलें आणि दीक्षेचा होम आतांच संपला!

प. दा०—हे गुरुपुरोहित कीं नाहीं मनुष्याला चैनच पडूं देत नाहींत—रात अपरात्र कांहीं त्यांना समजत नाहीं—देव रामचंद्र सिंहासनावर बसणार ह्या आनंदांत दोन घटका घालवूं ह्मटलें तर कामाची घाई अधिकच—सर्व राजवाड्याला आजची रात्र जागरण होणार. [ दंडकेश्वर येतो.

दंड०—फुलांच्या शय्येवरहि झोंप येत नाहीं—सर्वांना जागरणाच्या पिशा-चानें पछाडलें आहे काय ?—मला जांभई देखील येत नाहीं.—ही सगळी घाई कसली चालली आहे ?—कौसल्या देवीच्या मंदिरांत राजसभा भरली आहे ?

प. दा०—राजसभा नाहीं, होमहवन आहे.

दंड०—मग महाराज, वसिष्ठगुरु, सर्व मंत्री कशाला जमले आहेत ? तुह्मी मुख्य मंत्री होणार—होणार काय झालोंच आहें मी—महाराज जेथें जातील तेथें तुह्मी जा म्हणून विजयादेवीच्या पटांगणांतून मला हांकून

देण्यांत आलें; कौसल्या देवीच्या मंदिरांत राजसभा आहे, असें आमंत्रणहि मला दासीनें दिलें; इथें तर होमहवन ! होमहवनांत भिक्षुकी का महाराजांनीं व मंत्र्यांनीं करायची असते ?

दु. दा०—तुमच्या कपाळीं आतां भिक्षुकी आली आहे. विजयादेवी ह्मणत होत्या, उद्यां देव रामचंद्राला राज्याभिषेक झाल्यावर भीक मागितल्याशिवाय दंडकेश्वर व मंथरा या जोडप्याचें पोटच भरणार नाहीं.

दंड०—आळशांना उपासाचें भय वाटत नाहीं. उपाशी राहूनच पोटाला मिळविण्याचा धंदा आळशापासून सर्वांनीं शिकावा.

दु. दा०—मग भिक्षुकांचे मुख्य तुह्मी खात्रीनें होणार—पण इतक्या घाईनें कशाला भीक मागायला आलां—याचकांना दक्षिणा देण्याची वेळ जराशानें येईल—महाराज, वसिष्ठगुरु वगैरे मंडळी आतां इतक्यांत येथून जातील, मग होमहवनाच्याजवळ जा आणि हात पसरा ह्मणजे कौसल्या देवीपासून कांहींतरी दक्षणा मिळेल—

दंड०—मी हात पसरणार—हा आळशी हात पसरणार—अग ओटावरचा लाडू तोंडांत लोटण्यास मंथरा जर जवळ नसली तर मढ्याच्या मुखावरील पिंडाप्रमाणें लाडू घटका, दोन घटका, चार घटका जसाचातसा राहतो आणि कित्येक वेळां कावळयांनीं त्या पिंडाला टोंचल्यामुळें लाडू घशांत उतरत असतो, ठाऊक आहे !—मी भीक मागणार, मी दारोदार फिरणार, मी हात पुढें करणार—देवानें मला हात पाय उगीचच्या उगीच हालविण्याकरतां दिलेले नाहींत. आयत्या सुखानें हातापायावर लोटांगण घालावें लागतें तेव्हां सुखाच्या क्रीडेकरतां हातपाय हालले तर हालले !—भीक मागण्याची पाळीच आली तर मंथरा भीक मागेल—चळवळी बायको केली आहे एवढ्याचसाठीं—बायको भीक मागूं लागली ह्मणजे मी डोळादेखील उघडणार नाहीं—डोळ्याच्या पापणीला कोण श्रम देणार !—बायकोनें पाहिजे तर "ह्या आंधळ्याला, ह्या आंधळ्याला" ह्मणून ओरडत फिरावें, आणि मला आयतें खायला घालावें—मी भीक मागणार, मी दक्षिणा घेणार,

मी हात पसरणार–मंथरेला तसें करायला सांगा–मला आतां झोंप येत नसली तरी मी डोळे मिटून धरतों–सांगा आतां मंथरेला, "ह्या आंधळ्याला भीक घाला, ह्या आंधळ्याला भीक घाला," असें ओरडायला–ये ग मंथरे आणि ह्या आंधळ्यापुढें ओरडणारी भिकारीण तूं हो. [मंथरा येते.

**मंथ०**—महाराज कोठें आहेत ?

**दंड०**—तुझा महाराज–तुझा प्राणनाथ–हा मी येथें आंधळा होऊन उभा आहे–मंथरे डोळे मिटून मी आंधळा झालों असलों तरी तूं अंधळी नाहींस–तुला तुझा महाराज कसा दिसत नाहीं ?

**मंथ०**—मी दशरथ महाराज कोठें आहेत ह्मणून विचारलें हो–असें आंधळ्यासारखें काय उभें राहायचें?–जरा डोळस व्हा व मला ह्यावेळीं वाट दाखवा ह्मणजे माझ्या खटपटीनें तुह्मांला मंत्रिपद मिळेल आणि विजयेचा नक्षा उतरेल–दशरथ महाराज कोठें आहेत ?

**प. दा०**—विजयादेवी, सुमंत्रमंत्री, दशरथमहाराज, वसिष्ठगुरु, कौसल्यादेवी, सीतादेवी आणि देव रामलक्ष्मण होममंदिरांत आहेत; होम आटपून वसिष्ठगुरूंनीं देव रामचंद्राला सिंहासनाच्या महामंत्राची दीक्षा दिली; दशरथ महाराजांनीं सिंहासनावर बसण्यापूर्वीचा उपदेश केला आणि आतां कौसल्यादेवी राजमाता ह्मणून उपदेश करीत आहेत—

**दु. दा०**—उपदेश आटपून व्रतस्थ बसण्याकरितां देव रामचंद्र स्वतःचे मंदिराकडे जावयास निघेतों कोणासहि आंत सोडूं नका, अशी विजयादेवीची आज्ञा आहे—

**प. दा०**—तेव्हां ह्या आंधळ्याजवळ बहिऱ्या होऊन तुह्मी थोडा वेळ उभ्या रहा, म्हणजे बहिऱ्याआंधळ्याची जोडी चांगली शोभेल.

**मंथ०**—मी खरोखर बहिरी झालें तरी ह्या वेळीं मला आनंदच होईल–काय ऐकणें नशिबीं आलें आहे–राजमाता म्हणून कौसल्या रामाला उपदेश करीत आहे, विजया जवळ उभी आहे, दशरथमहाराजांच्या देखत ह्या

गोष्टी होत आहेत-आणि कैकेयी, मी, आणि हे आमचे-एक आंधळे, एक बहिरे, आणि कैकेयी ह्यावेळीं पांगळ्याप्रमाणें जमिनीवर लोळत पडली आहे—

प. दा०—तुमचें आतां काय चालणार ? आंधळे, पांगळे, व बहिरे होऊन भिक्षा मागण्याची टोळी काढा—

दंड०—रामराज्यांत आंधळ्या, पांगळ्या, थोटयांनाहि भिक्षा मागावी लागणार नाहीं-सर्वांना राजाराम आनंदांत ठेवणार आणि सुखानें खायला घालणार-आंधळ्यापांगळ्याकरतांच रामराज्य सुरू होणार-राजाराम, पतित-पावन राजाराम—

मंथ०—असें काय भिकाऱ्यासारखें ओरडायचें-हात काय पसरतां-नाचतां काय-ह्या आळशांनाहि असें नाचवतें कसें ?

दंड०—रामाचें नांव घेण्याबरोबर माझा आळस गेला-हात पाय हालूं लागले-आणि अयोध्येचा मंत्री होण्यापेक्षां दंडकारण्यांतील तपश्चर्या बरी वाटूं लागली-रामनामाचा चमत्कार असा आहे काय ?-राजाराम-पतित पावन राजाराम-मन्थरे, तूं रामनामाचा जप कर ह्मणजे माझ्याबरोबर दंडकारण्यांत तपश्चर्येला बसावें असें तुलाहि वाटूं लागेल-ह्मण, राजाराम, पतितपावन सीताराम-राजाराम-ह्मण-सीताराम-ह्मण-सीतेचें नांव घेतलेंस ह्मणजे नवऱ्याला मंत्री करण्यांत अर्थ नाहीं, असाच संचार तुझ्या अंगांत होईल-ह्मण-राजाराम पतितपावन सीताराम—

मंथ०—मी राम ह्मणणार-मी सीताराम ह्मणणार-कैकय देशाची मंथरा कोसल व मिथिल ह्या देशांचें वैभव कसें सहन करील ?-माझ्या कैकेयीचा, आम्हां सर्व कैकेय देशच्या स्त्रीपुरुषांना, आमच्या भरताचा अपमान होत असतांना तुह्मांला कौसल्येच्या मुलाच्या व त्याच्या बायकोच्या नांवाचा जप कसा करवतो ?-मी रामद्वेष्टी आहे, कौसल्येला पाण्यांत पाहाणारी मी आहे, जानकीला झिडकारणारी मी आहे,-विजयादेवीला खलबत कर ह्मणावें, आतां सूर्योदयानंतर पुष्यनक्षत्रावर तुह्माला मंत्री करून विजयादेवीसारखी मंत्र्याची बायको म्हणून मिरविल्याशिवाय मी रहाणार नाहीं.-राम नाम

कसलें घेतां, भरताचा जयजयकार करा किंवा मंथरादेवी असें ह्मणा, पुष्पनक्षत्रावर ही दासी मंथरा देवी मंथरा होणारच होणार—दासी विजया आणि देवी मंथरा, असा चमत्कार पुष्यनक्षत्रावर पहावयास मिळेल—कोठें आहे दासी विजया? कोठें आहे दासी विजया? मी अशी आंत जाते आणि दशरथमहाराजांचें दर्शन झाल्यावर विजयेला बजावते—तूं देवी नाहींस—दासी विजया बटकीप्रमाणें कैकेयीपाशीं राबली पाहिजे. [ विजया येते.

**विज०**—दासी विजया, दासी विजया, कैकेयीपाशीं राबणार ?

**प. दा०**—कैकेयीदेवी जमिनीवर अस्ताव्यस्त लोळून आजारी पडल्या आहेत; शुश्रूषेला विजयादेवीला बोलावण्याकरितां मंथरा दासी आली आहे.

**मंथ०**—मंथरादेवी आली आहे, पण विजया दासीला बोलावण्याकरितां नव्हे. कैकेयी जमीनीवर लोळत पडली आहे, हें महाराजांच्या कानांवर घालण्याकरितां ही देवी मंथरा—

**विज०**—देवी मंथरा !—कोणत्या पिशाचानें तुला पछाडलें आहे ? देव रामचंद्र सिंहासनावर बसणार ह्मणून आह्मीं सर्व आनंदांत मग्न असतांना आम्हाला अपशकुन करणारी तूं कोण ? ह्या राक्षसीला येथें कसें येऊं दिलेंत ?—मुकाट्यानें काळें तोंड कर, नाहींतर मिरच्यांची धुरी देऊन तुझ्या अंगचें पिशाच्च काढल्याशिवाय ह्या दासी राहणार नाहींत—दासी होऊन मी कैकेयीपाशी राबणार ? कायरे दंडकेश्वर, कोणचें भूत तुझ्या बायकोच्या मानगुटीवर बसलें आहे ?—मी दासी आणि तूं देवी !

**मंथ०**—होय, होय, तूं दासी आणि मी देवी, असेंच होणार. कैकेय देशाची ही मंथरा देवी होणार—कैकेय देशाला शिव्या देतां नव्हे ? आतां पहाल चमत्कार—

**विज०**—चमत्कार कसला पहायचा आहे ? कैकेयी कितीहि रुसून, फुगून, रागावून लोळत राहिली तरी राज्याभिषेक होऊन जाईतों तिच्याकडे कोणी ढुंकूनदेखील पहाणार नाहीं—राज्याभिषेकाच्या तयारीवर देखरेख करतां करतां दशरथमहाराजांना इतराशीं बोलण्याला फुरसत आहे कोठें ?—

आणखी दोनप्रहर राज्याभिषेकाशिवाय इतर कोणतीहि गोष्ट मजपाशीं बोलूं नका, अशी आज्ञा महाराजांनीं आह्मांला केली आहे–त्या वेळीं महाराजांचें दर्शन तुला होणार नाहीं. तुझ्या बडबडीचा अपशकुन–मूर्तिमंत अपशकुन आहेस–कैकेयी मंदिरांत लोळत पडली आहे तर तूं एखाद्या उकिरड्यांत लोळत पड–कैकेय देशचें नांवहि काढूं नकोस–राम राजा झाल्यावर कोसल देशचे सर्वच लोक देव व देवी होणार समजलीस?–हा ऐदी आळसानें लोळूं द्या–कैकेयी रागानें तडफडत लोळूं द्या, आणि फाजील घमेंडखोर मंथरा तोऱ्यानें कैकेयदेशच्या चिखलांत लोळूं द्या–येथें तुमचें काम नाहीं–ह्याग दासीनो ह्या अंधळ्याला आणि त्याच्या उन्मत्त बायकोला बाहेर हांकून द्या–मुकाट्यानें निघून जा, नाहींतर अयोध्येच्या बाहेर ह्या वेळीं तुला पिटाळून लावूं, समजलीस?

दंड०—चल मंथरे, ह्या आंधळ्याला दंडकारण्याचा रस्ता दाखीव–उगीच आढेवेढे घेऊं नकोस–अग राजा आणि आंधळा दोघेहि सारखेच–राजाला मुख्य मंत्र्यानें सांगावें तेव्हां ऐकू येतें, दुसऱ्या मंत्र्यानें वाट दाखवावी तेव्हां राजाचे पाय हालूं लागतात आणि तिसऱ्यानें पहावें तेव्हा राजा डोळस होतो–चल आतां मी राजा आणि तूं माझें मंत्रिमंडळ–माझ्याकरितां तूं बोल, माझ्याकरितां तूं पहा आणि माझ्याकरितां तूं वाट चाल–मला नुसते घांस चारीत जा–चल, तुझें आणि माझें मिळून दोघांचेंच राज्य दंडकारण्यांत करूं या–ह्मण, राजाराम, पतितपावन सीताराम, ह्मण राजाराम–अग असें राज्य आह्मी केल्यावर रामदेखील आमचेंच अनुकरण करील–काय नाहीं येत तूं दंडकारण्यांत?–तुझें नशीबच फुटकें–नको येऊस माझ्याबरोबर–अग राम स्वतः राम दंडकारण्याचा मार्ग मला दाखवील, तुझी काय प्रतिष्ठा? दाखवा ग दासींनो ह्या आंधळ्याला दंडकारण्याची वाट.–राजाराम पतितपावन सीताराम, राजाराम.. ...[दासी त्याला बाहेर नेतात.

विज०—तूंहि जा त्याच्या मागोमाग दंडकारण्यांत–कां येथें अशी आपली धिडका उभी कां?–कर काळें तोंड–न्याग दासींनो, न्या ह्या अप-

शकुनाला मंदिराच्या बाहेर ओढून–[ दासी येतात ] बऱ्या बोलानें निघून जातेस का–ह्या कैकेय देशच्या गोचिडया आपण होऊन कशाच्या अयोध्या नगरींतून जाणार–एकदां चिकटल्या ह्मणजे जन्माच्या चिकटल्या–रक्त शोषून रक्त शोषून खाल्लेंत–दशरथमहाराज पांढरे फिकट झाले–आतां जमिनीवर लोळण घ्या, डोळ्यांतून पाणी काढा किंवा आक्रोश करीत उर बडवून घ्या, राज्याभिषेक होईतों कैकेयीची आणि दशरथमहाराजांची गांठच पडायची नाहीं–दशरथमहाराजांना फुरसत आहे कोठें ? कैकेयी जमिनीवर लोळत पडली आहे ह्मणे–कैकेयी जमीन धरून बसूं दे, किंवा मंथरा कैकेयीला सावरून धरूं दे, कैकेयीला म्हणावें—

[ दशरथ व सुमंत्र येतात.

दश० – कोठें आहे कैकेयी देवी ? काय झालें देवीला ?

मथ०—कैकेयीदेवी जमिनीवर अंग टाकून रडत पडल्या आहेत–देवीची समजूत मी किती घातली, पण कांहीं केल्या त्यांचें दुःख कमी होत नाहीं; डोळ्यांतून एकसारखे अश्रू वहात आहेत; सर्व अलंकार जमिनीवर फेकून दिल्यामुळें चोहोकडे पसरलेल्या मोत्यांच्या दाण्यांत ह्या अश्रूंची भर पडून जमीन मोत्यांनीं आच्छादिलेली दिसत असली तरीं दुःखानें व क्रोधानें ताप-लेल्या देवीच्या शरिराकडे पाहिलें म्हणजे मन भांबावून जातें आणि काय होईल आणि काय नाहीं असें वाटतें ! तेव्हां महाराजांना तसदी देऊन महाराजांच्या कानावर हा मजकूर घालावा म्हणून मी येथें तातडीनें आलें आहे. कैकेयी देवीची अशी दशा होईल, नव्हतें ग बाई कोणाच्याहि स्वप्नीं देखील आलें नव्हतें.

सुमं०—हें नवीनच विघ्न उत्पन्न झालें !

विज०—अपशकुनी आहे, ही मंथरा अपशकुनी आहे–इडा पिडा टळो आणि सर्व विघ्नें दूर होऊन अभिषेकाचा समारंभ थाटानें पार पडो.

दश०—कैकेयी रागावली आहे–जमिनीवर लोळण घेऊन रडत बसली आहे !

**मंथ०**—होय महाराज; आम्ही किती शांतवन केलें पण देवीचा क्रोध व दुःख कांहीं केल्या कमी होत नाहीं. महाराजांच्या कानावर घालणें माझें काम होतें, तें मी केलें आहे.—माझ्या हातून चूक झाली असतांना सदय अंतःकरणानें चुकीची माफी महाराजांनीं आजपर्यंत केली आहे; ह्या नेहमींच्या अनुभवामुळें येथें आपण होऊन येण्याचें धाडस केलें—राज्याभिषेक होऊन जाईतों पाहिजे तर महाराजांनीं देवीच्या मंदिराकडे येऊं नये—प्रहर दोन प्रहर आम्हीच देवीची समजूत घालूं आणि राज्याभिषेक झाल्यावर महाराज देवीला दर्शन देतीलच.—आतां सुकून निर्जीव झालेलें देवीचें मुखकमल त्यावेळीं आपोआप टवटवीत होईल.

**दश०**—देवीचें मुखकमल सुकून गेलें आहे!—माझीच चूक झाली राजसभा आटोपल्याबरोबर येतो म्हणून सांगितलें—माझीच चूक झाली—सुमंत्र, कैकेयीदेवीच्या मंदिराकडे मला आतां गेलें पाहिजे.

**सुमं०**—राज्याभिषेकाच्या व्यवस्थेवर महाराज स्वतः नजर ठेवणार म्हणून आज्ञा झाली आणि आतां—

**विज०**—ही मंथरा आगलावी आहे, राज्याभिषेकांत विघ्न आणायचें आहे हिच्या मनांत; रामद्वेष्टी हिच्यासारखी दुसरी कुणीहि नाहीं.—राज्याभिषेक होईतों सर्व व्यवस्थेवर महाराजांची स्वतःची नजर असल्याशिवाय—

**दश०**—माझी नजर आहेच; पण कैकेयीचें मुखकमल कोमेजून गेलें आहे असें ऐकल्यानंतर माझ्या डोळ्यांना कैकेयीचें दर्शन घेतल्याशिवाय कसें चैन पडेल?

**मंथ०**—कमलिनी जर प्रफुल्लित झाली नाहीं तर स्वतःच्या प्रकाशाबद्दल चंद्राला कोठून अभिमान वाटणार आणि कमलिनीशिवाय इतरावर चंद्रकिरण कोठून पडणार!

**सुमं०**—थोरल्या देवींना मधल्या देवींच्या दर्शनाकरितां पाहिजे तर पाठवावें—

**विज०**—मीहि जर आज्ञा होईल तर कौसल्यादेवीबरोबर कैकेयीदेवीच्या

मंदिराकडे जाते. आम्ही दोघीजणी राज्याभिषेकाची वेळ होईतों तेथेंच बसून राहूं आणि कैकेयीदेवीला घेऊन समारंभ पहावयाला येऊं—

**मंथ०**—आगींत तेल ओतल्यासारखें होईल—महाराजांच्या प्रेमवृष्टीशिवाय ती आग विझविण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणाच्या अंगीं आहे ?

**दश०**—देवीचा संताप शांत करण्याची जादू ह्या हाताचे बोटांत भरपूर भरलेली आहे !—सुमंत्र तुम्ही काळजी करूं नका—माझी आणि तिची दृष्टादृष्ट झाल्यावर एका क्षणांत देवीच्या मुखावर स्मित हास्य खेळूं लागेल—काळजी नको—मला इतका वेळ कांहीं तरी चुकलें आहेसें वाटत होतें—दुश्चिन्ह मनांत डंवचत होतें—दुर्दैवाच्या भोंवऱ्यांत सांपडल्यासारखें होऊन रामाला उपदेश करतांना जीभ अडखळली आणि शरिराला कंप सुटला—

**सुमं०**—अति प्रेमामुळें असें होतें; त्यांत दुश्चिन्ह कसलें ?

**दश०**—दुश्चिन्ह कसलें ?—नाहीहि दुश्चिन्ह—अतिस्नेहामुळें संकट ओढवणार अशी भलतीच शंका येते—प्रेमी मन मुखशांतीचें माहेरघर नसतें—न बोलावतां त्या घरांत दुःखाचीं पिशाचें शिरतात—

**विज०**—त्यांतलेंच एक पिशाच मंथरा आहे—हिच्या सांगण्याप्रमाणें महाराजांनीं ह्या वेळीं वागूं नये—ह्या पिशाचांना—

**दश०**—नका हो हिला पिशाच म्हणूं नका.—माझ्या लाडक्या कैकेयीची ही आवडती दासी आहे.—आमच्यावरहि सत्ता चालविणाऱ्या वरिष्ठ सरकारच्या मुख्य मंत्र्याला दुखवून आमचें चालायचें नाहीं—मंथरे, तूं दासी नसून आमच्याहून श्रेष्ठ असलेल्या राजाधिराजांच्या मुख्य मंत्र्याचे पदावर तूं आहेस; तेव्हां नेहमींचा संप्रदाय एका बाजूस ठेऊन तुला देवीच म्हटलें पाहिजे.—कैकेयीचा राग कोणत्या उपायानें शांत होईल, सांग पाहूं मंथरे ?—आपल्या सरकारच्या हाताखालील मांडलिकाला मुख्य मंत्र्यानें कांहीं सल्लामसलत दिली पाहिजे.

**मंथ०**—शहाण्यांनीं शंकांच्या नादीं लागून वेळ व्यर्थ दवडूं नये; **ही दासी दुसरें काय सांगणार ?**

**विज०**—भूतपिशाचाची बाधा आहे का नुसता रुसवा आहे; सांगना महाराजांना खरी खरी माहिती.

**मंथ०**—कांहीं असलें तरी महाराज मुख्य मांत्रिक आहेत, महाराजांचे मंत्र इतरांना कोठें येताहेत ?

**दश०**—माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचाहि मंत्र कैकेयीवर चालणार नाहीं. तिचा मंत्र माझ्यावर चालतो आणि माझा मंत्र तिच्यावर चालतो. एकमेकांनीं एकमेकाला भारून टाकलें आहे. मी मुख्य मांत्रिक तर खराच–पण मन कसें खिन्न झालें आहे–कैकेयीकडे जायचें ह्मटलें ह्मणजे मनाला उल्हासाची भरती आल्यावांचून इतक्या दिवस राहिली नाहीं; पण आजच सर्व सुखाला एकदम ओहोटी लागल्यासारखें कां वाटतें ?–ह्या मांत्रिकाबरोबर दुसरा एकादा जादूगार असावा–माझें मन असें भित्रें कां झालें आहे ?–कोणाची मदत मी ह्यावेळीं घेऊं ? दोन प्रहरांत माझा सर्व भार मी रामाच्या मस्तकावर ठेवणार आहें–आतां नको राम माझ्या मदतीला—

**सुमं०**—देव रामचंद्रांनीं व्रतस्थ बसलें पाहिजे ना ?

**विज०**—व्रतांत नको बाई विघ्न–देव लक्ष्मणजींना पाहिजे तर बरोबर घेऊन जावें.

**मंथ०**—देव लक्ष्मण ! ताटकावधाची का तयारी आहे ? माझ्या मालकिणीला–कैकेयी देवीला–राक्षसीण कां समजतां ?

**दश०**—लक्ष्मण नको, पण रामनामाचा मंत्र कैकेयीवर चालतो–माझ्यावर जो मंत्र चालतो तो कैकेयीवर चाललाच पाहिजे–कैकेयी व मी एकजीव आहोंत.–रामाच्या नांवाचा उच्चार केल्याबरोबर हृदयांतील सर्व खळबळ शांत झाली आहे.–राजसभेंत काय ठरलें हें सांगण्याकरितां रामालाच कैकेयीकडे पाठवूं का ?–आतां धीर आला, युक्ति बरी सुचली, रामापुढें संकटें कसलीं टिकणार ?–मी कोण रामाला राज्याभिषेक करणार ? उगीच खोटा अभिमान–रामच अभिषेक करून घेत आहे, रामच तयारी करीत आहे,

रामच सर्व संकटाचें निवारण करणारा आहे–मन शांत झालें आहे–काळजी उरली नाहीं; बुद्धीचा निश्चय झाला आहे–सुमंत्र, असें करा, अभिषेकाच्या तयारीचें मी टांचण करून ठेवलें आहे, तें तुमच्या हवाली करतों आणि एका घटकेंत जर मी परतलों नाहीं तर रामाला कैकेयीच्या मंदिराकडे पाठवून द्या. कैकेयीच्या मंदिरांतच वसिष्ठगुरूंकडून पृथ्वीपालनाच्या महाव्रताची दीक्षा रामाला देण्याचें मीं ठरविलें आहे.

**मंथ०**—कैकेयीदेवीला दर्शन द्यावें म्हणून देव रामचंद्राला मी विनंति करणार आहें—

**दश०**—माझी कांहीं हरकत नाहीं–चला सुमंत्र मजबरोबर–तयारीचें टांचण तुह्माला समजावून सांगतों, मी कैकेयीच्या मंदिराकडे जातों आणि तुम्ही रामाला माझा बेत समजावून सांगा. [ दशरथ व सुमंत्र जातात.

**मंथ०**—अपशकुनी कोण ?–तूं का मी ?–आज महाराजांनीं मला देवी म्हटलें उद्यां तुला सर्व लोक दासी म्हणायला चुकायचे नाहींत. रामद्वेष्टी म्हणून महाराजांपुढें माझी निंदा केलीस–काय झालें ? उद्यां माझीं आर्जवें सर्वांना करावीं लागतील, आहेस कोठें ?

**विज०**—अभिषेकाचा समारंभ पार पडूं द्या, मग उत्तर देईन–कौसल्या देवी राजमाता होऊं द्या–मंथरे, तुझी धिंड निघेल अयोध्येंत तुझी धिंड निघेल—

**मंथ०**—माझी मिरवणूक निघणार आहे–मी रथांतून मिरवणार आहें, मी पालखींतून मिरवणार आहें, हत्तीवरून मी मिरवणार आहें, राम लक्ष्मण मला चौऱ्या वारतील–मला मुलगा असता तर तो राज्यावर बसला असता आणि राजमाता म्हणून रामलक्ष्मणानीं माझ्यावर चौऱ्या वारल्या असत्या–जाऊं दे, नाहीं तर नाहीं मुलगा–सर्व कैकेय देश माझ्या मुलांमुलींच्या जागीं आहे–कैकेय देशाची अधिष्ठात्री देवता म्हणून माझी पूजा अर्चा चालली असतांना ह्या मंथरेवर चौऱ्या रामलक्ष्मण— [ लक्ष्मण येतो.

**लक्ष्म०**—हा लक्ष्मण मंथरा दासीवर चौऱ्या वारणार!—रामाची निंदा कौसल्यामातेच्या मंदिरांत! मंथरे, तूं कैकेयीची दासी म्हणून इतकी शेफारून जावीस हं! कैकेयी मातेच्या तंत्रानें बाबा वागतात; पण उद्यांपासून रामराज्य सुरू व्हावयाचें आहे, आणि राजमाता कौसल्येची निंदा करणारांनी नेहमीं ध्यानांत ठेवावें कीं, ह्या धनुर्धर लक्ष्मणानें रामाच्या सेवेला आपलें धनुष्य व आपले बाण अर्पण केले आहेत. राम एकबाणी आहे, माझा भाता बाणांनी भरलेला आहे, विश्वामित्राचीं सर्व अस्त्रें मजपाशीं आहेत. राम नाइलाज होईतों धनुष्यबाणाला हात लावीत नाहीं; पण ह्या लक्ष्मणाचे बाण रामनिंदा करणारा शब्द ओठांतून बाहेर पडण्यापूर्वींच मुळामकट जीभ उपटून काढण्यास रात्रंदिवस टपलेले असतात—मंथरे, जाऊन सांग कैकेयीदेवीला इतक्या दिवस कौसल्येची व रामाची निंदा केलीत तेवढी पुरी झाली; पुन्हा जर तुझ्यासारख्या दासींनीं आपली मर्यादा सोडली तर स्त्रीजात म्हणून कोणाचीहि गय हा लक्ष्मण करणार नाहीं—रामलक्ष्मण तुझ्यावर चौऱ्या वारणार! पुन्हा ते शब्द उच्चार आणि जीभ ठिकाणावर राहते कीं काय तें पहा.

**मंथ०**—माझी मालकीण कैकेयीदेवी माझें रक्षण करण्यास समर्थ आहे—एकबाणी रामाचें मला भय वाटत नाहीं, आणि बाणांचा भारा वाहणाऱ्या लक्ष्मणाचेंहि भय वाटत नाहीं—माझी जीभ जर ठिकाणावर राहिली नाहीं तर कौसल देशांतील एकाचेंहि घरदार ठिकाणावर राहणार नाहीं—मी विचार करूनच बोलत असतें समजलांत? बायकांच्या जिभा उपटण्याचा पराक्रम जर तुमच्या बाणांना करून दाखवावयाचा असेल तर ह्या विजयेची जीभ उपटून काढा आणि कैकेयीची निंदा—

**विज०**—कैकयीची निंदा कोण करणार नाहीं? कौसल्या देवीला जी पाण्यांत पहाते तिची निंदा कोण करणार नाहीं? रामाचा द्वेष करणाऱ्या ह्या अवदसेला तुरुंगांत आतां कोंडूनच ठेवलें पाहिजे—देव लक्ष्मणमहाराज,

हिला कोंडून ठेवण्याची व कैकेयीच्या मंदिराकडे जावयास निघालेल्या दशरथमहाराजांना ह्याच पावलीं मागें परतविण्याची जर आतांच्या आतां व्यवस्था झाली नाहीं तर अभिषेकाचे वेळीं मोठा अनर्थ कोसळणार, असें मला वाटत आहे.

**लक्ष्म०**—बाबा कोठें गेले आहेत ?

**मन्थ०**—माझ्या मालकिणीच्या मंदिराकडे आतां इतक्यांत दशरथ महाराज जाणार आहेत; देव रामचंद्राला तिकडे यावयास सांगून मीहि कैकेयीच्याच मंदिराकडे जाणार आहें. माझी जीभ रामद्वेष्टी आहे, हें मी झांकून ठेवूं इच्छित नाहीं; तुमच्या बाणांनीं माझी जीभ माझ्या मुखांतून बाहेर पडूं द्या, किती लोकाना घरादारांतन बाहेर पडावें लागेल, हे कैकेयीच्या मंदिरांत सर्वांना समजून येईल–काढा भात्यांतून बाण आणि छाती असेल तर मंथरेच्या जिभेवर शरसंधान करून—

**लक्ष्म०**—तुकडे तुकडे तुझ्या जिभेचे करून टाकतों–कौसल्येच्या मंदिरांत, ह्या लक्ष्मणाच्या देखत रामनिंदा! मग विश्वामित्रापाशीं उगीच अस्त्रविद्या शिकलों, असें होईल.

**विज०**—हिला तुरुंगांत कोंडून ठेवणें हेंच ह्या वेळीं योग्य. कारागृहांत खुशाल जीभ चालूं द्या, वाळवंटावर पडलेल्या पावसामुळें जसा चिखल होत नाहीं तसा हिच्या शिव्याशापामुळें मग अभिषेकाला अपशकुनहि होणार नाहीं.

**मंथ०**—मला तुमचे शिव्याशाप ऐकत बसण्याला फुरसत नाहीं. रामाचा द्वेष मी करीत असलें तरी त्याची गांठ मी आतां घेणार आणि कैकेयीकडे येण्याचा निरोप सांगून—

**विज०**—तूं काळें तोंड करशील, पण जाऊं कोण देतो ? तुला कोंडून ठेवून दशरथ महाराजांना आम्ही आतां मागें फिरवूं आणि ह्या अपशकुनाला मातींत गाडून टाकूं.

**लक्ष्म०**—रामनिंदेबद्दल तुझ्या जिभेचे तुकडे तुकडे मी प्रथम करून टाकतो. रामनिंदा अयोध्येच्या तुरुंगाच्या भिंतीहि ऐकून घेणार

नाहींत.-हा पहा बाण मी भात्यांतून बाहेर काढला-धनुष्यावर चढविण्याचा अवकाश, झालेंच ह्मणून समज तुझ्या जिभेचे हजारो तुकडे—

[ बाण चढवूं लागतो. राम व सीता प्रवेश करतात.
राम धनुष्यावरील बाण काढून घेतो. ]

**राम०**—लक्ष्मणा, हें काय आरंभिलें आहेस ? मातोश्रीच्या मंदिरांत आणि एका स्त्रीवर शरसंधान ! आईच्या घरांत सर्व बायका सुरक्षित असल्या पाहिजेत-तुझा बाण भात्यांतच असूं दे; मंथरे तुला अभय आहे.

**मंथ०**—कैकेयीदेवी क्रोधानें संतप्त होऊन जमिनीवर लोळत पडल्या आहेत; दशरथमहाराज आतां तिकडेच जावयास निघाले असून आपणहि घटकाभरानें कैकेयीदेवीच्या दर्शनास यावें, अशी कैकेयीदेवीची आज्ञा आहे.

**राम०**—कैकेयी मातोश्रीच्या आज्ञेचें उल्लंघन कोण करणार ? मंथरे, श्रीनारायणाच्या मूर्तीपुढें ध्यानस्थ बसून अभिषेकापूर्वीच्या मंत्राचा जप करण्यापूर्वी आतां इतक्यांत मी दर्शनाला येतों म्हणून कैकेयी मातोश्रीला विनंति कर.

**विज०**—ह्या मंथरेला येथेंच कोंडून ठेवली पाहिजे, महाराज.

**राम०**—काय म्हणून ?

**लक्ष्म०**—रामद्वेष्टी ह्मणून ही आमच्यादेखत येथें मिरवीत आहे.

**विज०**—हिनें आह्मांला अपशकुन केला आहे—

**लक्ष्म०**—दादा, आपला द्वेष जर मी येथेंहि माजूं दिला तर मी आपला पाठीराखा भाऊ कसचा !

**सीता०**—पण भाऊजी, इकडच्या निंदेहूनहि स्त्रीहत्येचा अपशकुन अधिक मोठा होणार नाहीं का? शिवाय असलें निंदेचें गालबोट अभिषेकाच्या समारंभाची शोभा अधिकच वाढविणार आहे.

**राम०**—लक्ष्मणा, अगदीं अखेरची नाईलाजाची वेळ येईतों भात्यांतील बाणांना हात लावूं नये-वसिष्टगुरूंनीं पृथ्वीपालनाच्या महामंत्राची स्तुति करतांना हाच उपदेश मला आतां केला आणि धनुर्धर या नात्यानें नाहक

हत्या मजकडून होऊं नये अशीच श्रीनारायणाची प्रार्थना करीत मी स्वस्थ बसणार आहें. दैत्य, राक्षस, यज्ञयागाचा संहार करणारे दुरात्मे काय कमी आहेत? लक्ष्मणा, तुझ्या भात्य तील बाण त्या राक्षसांकरितां आहेत; आईच्या मंदिरांत उगीच शरसंधान करण्याकरितां तुझी अस्त्रविद्या नाहीं.

**लक्ष्म०**—महाराज आपला राज्याभिषेक निर्विघ्न पार पाडणें हें आमचें काम आहे; ही मंथरा अभिषेकाला विघ्न करीत आहे, आणि हें विघ्न येथेंच नाहींसें करण्याकरितां मी हिचा प्राण घेणार नव्हतों, रामनिंदा करणाऱ्या जिभेला मात्र उपटून टाकणार होतों. आपल्या आज्ञेनें बाण भात्यांत घातला आहे—पण हिला येथें कोंडून ठेवल्याशिवाय समारंभ नीट पार पडेल असें वाटत नाहीं. विष ओकून टाकायचें नसेल तर निदान एका जागींच खिळून राहील व सर्व शरिराला त्रास होणार नाहीं, असें नको का वागायला? शंकरांनीं हालाहल विष पितांना कंठांतच तें विष कोंडून ठेवलें ना?

**राम०**—निंदेच्या विषाचा दाह रामाच्या शरिराला जर झाला तर शिवधनुष्याचा भंग करून सीतेचें पाणिग्रहण करणाऱ्या तुझ्या भावाची ख्याति, लक्ष्मणा, खोटी नाहीं का ठरणार? ज्यानें शिवधनुष्याचा भंग केला तो निंदेमुळें थोडासा तरी व्याकुळ होईल, असें लक्ष्मणा तुला वाटतें तरी कसें? मंथरे तुला अभय आहे,—माझ्या निंदेबद्दल तुला कोणीहि त्रास देणार नाहीं, तुला अभय आहे—

**मंथ०**—मला भय कोणाचेंच नाहीं; कैकेयीला दुःख झालें ह्मणजे मला दुःख होतें, कैकेयीला सुख झालें ह्मणजे मला सुख होतें; मग मला भय प्राप्त झाल्यावर कैकेयीलाहि भय प्राप्त झालेंच पाहिजे. मला कैदेंत टाकणें आणि कैकेयीला कैदेंत टाकणें सारखेंच आहे. कैकेयी इतकीच मीहि निर्भय आहें, समजलीस विजये? मी कैकेयीचें शरीर आहें, कैकेयी माझा आत्मा आहे. एकट्या दशरथमहाराजांशिवाय कैकेयीला काय किंवा मंथरेला काय

कैदेंत टाकण्याचें सामर्थ्य आज कोणालाच नाहीं.—नवा राज्याभिषेक व्हायचा आहे, झालेला नाहीं.

**लक्ष्म०**—पण राज्याभिषेकाचा सर्व अक्त्यार बाबांनीं वसिष्ठगुरुंना दिलेला आहे, आणि कोठें विघ्न उपस्थित झालें तर जागच्या जागींच त्याचा बंदोबस्त कर, अशी गुरुजींची मला आज्ञा आहे. दादा, राज्याभिषेक झाल्यावर आपली आज्ञा हा लक्ष्मण शिरसावंद्य मानील, पण तोंपर्यंत गुरुजींच्या आज्ञेला अनुसरून ह्या मंथरेला मी कोंडून ठेवणार—

**मंथ०**—मी निर्भय आहे, मी निर्भय आहें,—　　[जाऊं लागते.

**लक्ष्म०**—खबरदार जाशील तर—रामनिंदेचें विष मी तुला ह्या मंदिराबाहेर पसरूं देणार नाहीं—

**विज०**—दासींनो, या लवकर आणि चांडाळणीला अटकेंत ठेवा—

[ दासी येतात व मंथरेला धरतात.

**राम०**—मंथरे, तुला अभय आहे—वसिष्ठगुरुंनाच विनंति करून मी तुझी सुटका करतों—

**लक्ष्म०**—मी वसिष्ठगुरुंच्या कानावर प्रथम सर्व हकीकत घालतों—पाहूं कशी हिची सुटका होते ती !

**राम०**—लक्ष्मणा, थोड्यासाठीं कशाला हट्टास पेटतोस ?—मंथरे, लक्ष्मणाची समजूत मीच घालतों आणि अटकेंतून तुला सोडवितों—लक्ष्मणा—

**लक्ष्म०**—दादा, ह्या वेळीं मी कांहीं तुमचें ऐकणार नाहीं. सर्व जगानें अडदांड म्हणून माझी छीःथूः केली तरी पत्करलें, पण रामनिंदा लक्ष्मण सहन करतो, असा डाग रामाच्या ह्या सेवकाला लागतां कामा नये. ह्या मंथरेला जर अशी जाऊं दिली तर मी रामभक्त कसचा ?—मोडणार मी आपली आज्ञा; माझा अंत पाहूं नका—मग माझ्या भात्यांतील बाणहि गप्प बसणार नाहींत—हे पहा उसळीसरसे एक एक बाहेर आले—

**सीता०**—हें काय भलतेंच भाऊजी ? बाण भात्यांतच राहूं द्या—हा गलबला ऐकून वसिष्ठगुरु आणि सासूबाई इकडेच आल्या.

[ वसिष्ठ आणि कौसल्या येतात.

**कौस०**—राम, लक्ष्मण, तुम्ही काय म्हणून आपआपसांत भांडत आहां?

**लक्ष्म०**—भांडत नाहीं, आई. गुरुजींच्या आज्ञेप्रमाणें मी वागत आहें. अभिषेकाला अडथळा करणारांना जागच्याजागींच अटकेंत ठेव म्हणून गुरुजींनीं आज्ञा केली—

**वसि०**—होय, माझी तशीच आज्ञा आहे. अभिषेकाचा समारंभ सुरळितपणें पार पाडण्याचा बोजा महाराजांनीं माझ्या मस्तकावर ठेविला आहे. महाराज स्वतः देखरेख करीत आहेत; पण जबाबदारी माझी आहे. अडथळा जागच्याजागीं दाबला गेल्याशिवाय अल्प अवकाशांत काम उरकणार नाहीं; पण, देव लक्ष्मण, अडथळा कोण करीत आहे!

**विज०**—ही मंथरा अडथळा करीत आहे-राज्याभिषेकाची बातमी ऐकून कैकेयीदेवीनें संतापानें जमिनीवर लोळण घेतली असून,—

**मंथ०**—कैकेयीचा क्रोध शांत करण्याकरितां महाराज कैकेयीच्या मंदिरांत जावयास निघाले आहेत; देव रामचंद्रहि त्यांच्या पाटोपाठ जाणार आहेत; आणि लाडक्या राणीला रडत टेकून समारंभ साजरा करण्यांत येत आहे, अशी रघुकुलाची निंदा ही मंथरा चोहोंकडे करीत आहे!

**कौस०**—अगबाई, कसा ग हा अपशकून मूर्तिमंत माझ्यापुढें उभा राहिला! गुरुजी, कांहीं तरी तोड काढा, मला तर हें दुश्चिन्ह भयंकर वाटतें—

**लक्ष्म०**—ह्या अपशकुनाला असें आम्हीं अटकेंत ठेविलें आहे—

**राम०**—मी मंथरेला अभय दिलें आहे.

**वसि०**—रामानें अभय दिलें आहे; एकवचनी रामचंद्राचा शब्द खरा झालाच पाहिजे.–दासींनों, द्या सोडून मंथरेला. (दासी तसें करतात) मंथरे, तूं खुशाल पाहिजे तिकडे जा व पाहिजे तें बडबडत रहा.

**विज०**—जा ना येथून–जाऊं द्या धिंडका येथून—

**मंथ०**—मी निर्भय आहें, माझी मी मुक्त्यार आहे, पाहिजे तर जाईन, पाहिजे तर अशी उभी राहीन.

**वसि०**—महाराज कैकेयीदेवीच्या मंदिराकडे गेले का ?

**लक्ष्म०**—आतां इतक्यांत जातील.

**वसि०**—मी स्वतः जाऊन महाराजांना विनंति करतों राज्याभिषेक पार पडेतों अरिष्टशांतीच्या होमाच्या आहुती महाराजांनीं आणि मातोश्रींनीं मिळून देत बसलें पाहिजे, एरव्हीं विघ्नें नाहींशीं व्हायचीं नाहींत.

**कौस०**—उपाध्यायांना होम करावयास सांगण्यापेक्षां स्वतः आम्हीं दोघांनीं तो होम करावा, अशी मीं मघाशीं विनंति देखील केली; रामाच्या शेजारीं नारायणाचे मंदिरांत सीता जप करणार आहे, तिला सम्राज्ञीचा उपदेश कर म्हणून सांगणें झालें; अपत्यस्नेहामुळें मी तसें करण्याचें कबूल केलें आणि विघ्नाच्या शांतीकडे दुर्लक्ष केलें. पण आतां तर अरिष्ट मला प्रत्यक्ष दिसत आहे !

**वसि०**—कांहीं भिण्याचें कारण नाहीं. महाराजांना ह्या पावलींच मी परत बोलावून आणतों, आपण दंपत्यानें अरिष्ट शांतीचा होम करा.—देव लक्ष्मण, मातोश्रीच्या मंदिरांत महाराजांच्या जवळ आपण असावें; महाराज येथें आल्याबरोबर देव रामचंद्राच्या व्रतपालनाचे दीक्षेवर नजर ठेवण्याकरतां मी स्वतः श्रीनारायणाचे मंदिरांत उभा राहतों; मग तर चिंता नाहीं ! जाऊं मी महाराजांना परत आणावयाला ?

**राम०**—गुरुजींनीं माझी विनंति प्रथम ऐकून घ्यावी आणि मग कायतो विचार ठरवावा, संकट टाळून काय करायचें ? संकटाचे आघात सोसण्यांत अधिक सुख नाहीं का ? कैकेयी मातोश्री आणि ही माझी कौसल्या आई, काय फरक आहे ? दोघींचेहि चरण ह्या रामाला पवित्र तीर्थासारखे आहेत. आई, तूं जर माझ्या राज्याभिषेकाच्या वेळीं रुसून, रागावून, जमिनीवर लोळण घेऊन बसलीस तर माझें अंतःकरण जितकें कळवळेल तितकेंच कैकेयीसंबंधानें आतां कळवळत आहे. राज्यसूत्रें माझ्या हवालीं करण्यापूर्वी कैकेयी मातोश्रीचें समाधान जर बाबांना करतां आलें नाहीं, तर निष्कंटक राज्य पुढच्या पिढीच्या स्वाधीन बाबांनीं केलें, असें कसें ह्मणतां येईल ?

कैकेयी मातोश्रींचें समाधान बाबा खात्रीनें करतील; त्यांना परत बोलावण्यांत अर्थ कोणता ? कैकेयी मातोश्रींचें समाधान करतांना आम्ही सर्वांनीं ह्यावेळीं बाबानांच मदत केली पाहिजे. श्रीनारायणाला नमस्कार करून मी आतांच बाबांच्या मदतीला कैकेयी मातोश्रींच्या मंदिराकडे जाणार आहें. भरत आणि राम दोनहि लेकरें त्या माऊलीला सारखीं आहेत—त्या माऊलीचा अभय हस्त आई तुझ्या आशीर्वादाप्रमाणेंच ह्या रामाच्या मस्तकीं नको का असायला ?

वसि०—शिष्य ह्या नात्यानें मी तुला सांगतों, रामा, नव्हे रामचंद्र...

राम०—कौसल्या किंवा कैकेयी ह्याहूनहि अधिक जिव्हाळ्याचें नातें गुरुमाऊलीशीं रामाचें आहे; गुरुजींनीं रामा ह्मणण्यानेंच मला अधिक आनंद होतो.

वसि०—रामचंद्र, मत्सर ह्मणून एक षड्रिपूंत तुमचा आमचा शत्रु आहे; आणि मत्सर मन्मथाइतकाच किंबहुना अधिक प्रबल असल्यामुळें कार्य आरंभिलें असतां मन्मथाप्रमाणेंच कार्यकर्त्यांनीं त्याला टाळणें जरूरीचें असतें.

राम०—गुरुजी, आपल्या प्रसादानें कोणत्याच षड्रिपूंची बाधा रामाला झालेली नाहीं व होणारहि नाहीं. मत्सराला टाळून मत्सराची ओळख होण्यापेक्षां मत्सर सामोरा आला असतांना मत्सराला जिंकून मत्सराची माहिती रामाला होणें अधिक चांगलें नाहीं का ? मातोश्री कैकेयीला मत्सर वाटत असेल—

कौस०—सवती-मत्सराची ओळख, बाळ तुला नाहीं रे नाहीं—आणि नको ती ओळख व्हायला—तूं नारायणाचे मंदिरांत एकदम व्रतस्थ बैस कसा—

राम०—आई, तुझ्या अंतःकरणांत किंवा कैकेयी मातोश्रींच्या अंतःकरणांत मत्सराचें शल्य जर मीं शिल्लक ठेवलें तर राज्यावर बसून सर्व प्रजाजनांना सुखी मी कसा ठेवणार ! आईइतकी कनवाळू कोणी नाहीं; बायकोइतकी आज्ञाधारक जगांत कोणीहि नाहीं; नव्या राज्याभिषेकासारख्या

अत्यंत पवित्र व महत्वाच्या कार्यास आरंभ करतांना बाबांना जर आपल्या आवडत्या राणीचें मन प्रसन्न करून घेतां आलें नाहीं, ह्या रामाला मातोश्री कैकेयीचा आशिर्वाद घ्यावयाला जर लाज वाटली, गुरुमाउलीनें जर ह्याला येथें थोपटून धर त्याला तेथें थोपटून धर, अशी नुसती वेळ मारून नेली, तर अभिषेकानंतर आंतून मोडलेल्या व वरून धीरे दिलेल्या सिंहासनावरच रामाला बसविणार ना ? रघुकुलांत माझा जन्म-सिंहासन सोडणारे माझे बाबा दशरथ महाराज मला सिंहासनावर बसवितांना माझ्या कैकेयी मातोश्रीशीं दोन शब्दहि बोलूं शकले नाहीत, आणि सिंहासनावर बसणारा हा राम आपल्या आईच्या चरणावर मस्तक ठेवूं शकला नाहीं, अशी दोन पिढ्यांची रघुकुलाची नाचक्की ह्या वेळीं गुरुजी कशाला पाहिजे ? बाबांच्या हातून जर कैकेयी मातोश्रीचें समाधान झालें नाहीं तर मी कैकेयी माऊलीला प्रसन्न करायला समर्थ आहें-आई, तुझा राम कैकेय देशांत आहे आणि भरत मी आहें-गुरुजी, बाबांना आपण मनाई करूं नका आणि आईकडे धावत जाणाऱ्या ह्या भरतालाहि मागें परतवूं नका.

**वासि०**—रामा, प्रेमाच्या सत्तेमुळें तूं ह्या पूर्वींच महाराज रामचंद्र झाला आहेस. ह्या वेळीं महाराजांच्या इच्छेप्रमाणें वागण्यांत मला कसेंसेंच जरी वाटत असलें तरी आपला शब्द राजाज्ञेप्रमाणें सर्वांनी पाळणें इष्ट आहे-अरिष्टशांतीचा होम आपण आतां स्वतः करावा-लक्ष्मणा, तूंहि मातोश्रीच्या मदतीला रहा-मी रामाबरोबर नारायणाचे दर्शनाला प्रथम जातों आणि नंतर रामाचा पाठीराखा म्हणून कैकेयीदेवीच्या मंदिरांत रामाच्या मागें उभा रहातों-विजयादेवी, तुम्ही सीतेच्या मंदिरांत असा म्हणजे कोणालाच ह्या अपशकुनाची बाधा होणार नाहीं.

**लक्ष्म०**—गुरुजींची आज्ञा यशस्वीच होणार आहे.

[ मन्थरेशिवाय सर्व जातात.

**मंथ०**—[ स्वगत ] बसा आतां होम करीत, घ्या नारायणाचें दर्शन, करा एकमेकांचें समाधान, दुःखाचें छत माझ्यामुळें चोहोंकडे पसरलें आहे.-

मी तेवढी आनंदी आहें.—कैकेयींच्या जाळ्यांत दशरथ सापडूं द्या, मी खणलेल्या खड्ड्यांत राम पडूं द्या, मंथरेचा आनंद त्रिभुवनांत मावणार नाहीं.—मला वाटलेंच होतें हा थेरडा वसिष्ठ कैकेयीची आणि दशरथाची गांठच पडूं देणार नाहीं—बायकांच्या मसलतीपुढें पुरुषांची मसलत काय चालणार! दिला डांगोरा पिटवून कैकेयी जमिनीवर लोळत पडली आहे ह्मणून—ज्याला त्याला आपआपली लाज राखतां राखतां आतां पुरे वाट झाली आहे!—कैकेयीला मसलतींत न घेतां राजसभा भरवून राज्याभिषेकाचा निश्चय केला! राजसभेंत बायकांना बोलावलें नाहीं! घ्या प्रायश्चित आतां कैकेयीच्या मंदिरांत.—रामाचा पाठीराखा ह्मणून वसिष्ठ येणार—दिव्यावर पतंग जसे पडतात, मी पेटविलेल्या अग्नींत होरपळण्याकरितां सर्वजण या, आणि आगींत पडून तडफडणाऱ्या वैऱ्यांच्या यातना ह्या मंथरेला सुखासमाधानानें पाहूं द्या. [जाते.

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळ**०—कैकेयीचा महाल. **कैकेयी** जमिनीवर लोळत पडली आहे; **दशरथ** जवळ उभा आहे. ]

**दश**०—कैकेयी, हें काय आरंभिलें आहेस? तारांगणालाहि लाजविणारा, शशिसूर्यप्रभेला खालीं पहावयास लावणारा, आणि इंद्रसभेवर ताण करणारा तुझा रंगमहाल सोडून ह्या भिकारड्या जागेंत जमिनीवर लोळत कां पडली आहेस?—लाडके, ऊठ आणि दोन गोड शब्द बोलून ह्या दशरथाला कृतार्थ कर.—राजसभेंतून मी ताबडतोब तुझ्याकडे आलों नाहीं—अपराधी हात जोडून जवळ उभा आहे—नेहमींप्रमाणें करपाशांनीं ह्या अपराध्याला अटकेंत ठेवून, नेत्रबाणांनीं विव्हल करून, दंतव्रणांनीं घायाळ करून शिक्षा करायला उशीर काय म्हणून? ऊठ, सुंदरी, ऊठ आणि तुझ्या मनांत येईल ती शिक्षा कर,

शिक्षा सोसायला तुझा दास तयार आहे. ( कैकेयीला उठवतो. ) असा राग कां !–कैकेयी, तुझ्या ह्या क्रोधामुळेंच तूं मला नेहमींहून अधिक प्रिय झाली आहेस. जमिनीवर चोहोंकडे पडलेले तुझ्या अंगावरचे दागिने आकाशांतील चांदण्याप्रमाणें चोहोंकडे चमकत आहेत आणि चंद्रिकेप्रमाणें तुझें मुखकमल त्या चांदण्यामध्यें शोभत असून, ही जागा रजनीप्रमाणें माझ्या मनाला आल्हाददायक झाली आहे. लाडके, तुझ्या रागाचें कारण क्षणभर मला सांगू नकोस, डोळे भरून ह्या रजनीच्या सौंदर्याची लूट मला करूं द्या.

कैके०—महाराज, आपण कामुक आहां, पण ही कैकेयी आतां कामुक उरलेली नाहीं. कामुकाप्रमाणें माझी स्तुति ऐकण्याकरितां ह्या ठिकाणीं धरणीमातेच्या पायावर मी लोटांगण घातलेलें नाहीं. कामुकपणा सोडून मजपाशीं बोलायचें असलें तर बोलावें; माझ्या दुःखाच्या भाराखालीं मी दडपून गेलें आहें, कामुक भाषणानें माझ्या दुःखाचा भार अधिक जड कां करीत आहां ?

दश०—कैकेयी, मी तसें करूं नको तर काय करूं !–तुझें पाणिग्रहण केलें त्या वेळेपासून हा दशरथ जन्माचा कामुक बनला आहे. तुझी गांठ पडण्यापूर्वी, हा दशरथ दैत्यांचा संहार करून देवकार्य तडीस नेणार आणि भगवान् नारायणाला अवतार घेण्याचें कारणच उरणार नाहीं, अशी माझी स्तुति तिन्ही लोकांत होत होती; पण तुझ्या सौंदर्यानें मला कामुक केलें आणि परमेश्वरी कार्य स्वतः न करतां परमेश्वरी सृष्टींतच आनंद मानून, विधात्याच्या ह्या अलौकिक रत्नाचीच पूजाअर्चा करण्यानें परमेश्वर संतुष्ट होईल, असा माझ्या बुद्धीचा निश्चय तुझ्या लावण्यानें केला. कैकेयी, तुझी उगीच स्तुति करतों असें समजूं नकोस. लावण्य झालें तरी परमेश्वरच होय; सर्वांत मला अत्यंत प्रिय असलेल्या रामाची शपथ घेऊन मी तुला सांगतों, त्या प्रत्यक्ष परमेश्वरी अवतारापेक्षां तुझ्या सौंदर्याची आसक्ति माझ्या जिवाला अधिक जखडून राहिलेली आहे. ह्मणूनच कैकेयी, राज्यकारभाराची सर्व दगदग सकाळीं पुष्यनक्षत्रावर रामाच्या माथीं मारून निष्काळजी

कामुकपणानें सर्व आयुष्य तुझ्याजवळ आनंदांत काढण्याचें मीं ठरविलें आहे. सौंदर्याचा हा विजय आहे, आणि विजयाची ही बातमी ऐकून तुझा क्रोध—

कैके०—माझा क्रोध अधिकच पेट घेत आहे—

दश०—आणि रागावलेली कैकेयीच मला अधिक सुंदर दिसत आहे. माझ्या म्हातारपणींहि ज्या सौंदर्याची लकाकी मला कायमचा तरुण करूं शकते, तें सौंदर्य कायम टिकणारें सत्य आहे असें मी कां समजूं नये?— ह्या सत्याचा लाभ करून देणारा माझा कामुकपणाच ह्मणजे मोक्ष आहे, असा उपदेश, कैकेयी, तूं ह्या वेळीं मला करीत आहेस—नुसत्या डोळ्यांनींच हा मोक्ष दिसावा आणि कानांना ऐकूं येऊं नये, ओठांना पितां येऊं नये, सर्व शरीराला त्याचा साक्षात्कार होऊं नये, असे ह्या मुमुक्षूचे हाल कैकेयी, ह्या वेळीं कां करीत आहेस?

कैके०—महाराज, विश्वांतील सर्व सौंदर्याचा मूर्तिमंत अवतार मी आहे, असा अभिमान मी इतके दिवस मिरवीत आलें आहे आणि आजहि मिरवीत आहे; पण विश्वांतील सौंदर्य म्हणजे सत्य नव्हे, ह्या देहांतच सर्व सुख सांठलेलें आहे म्हणून मनुष्याला मोह पाडणारी विश्वाची मोहिनी म्हणजे सत्य नव्हे, विश्वांतला सर्वांना सारखाच ग्रासणारा कामुकपणा ह्मणजे सत्य नव्हे, हें ह्या कैकयीला आतां पुरतें समजून चुकलें आहे.—कामुकपणाच जर सत्य असता तर मी आज दुःखी कष्टी कां झालें असते? माझ्या दुःखाची तुह्माला पर्वा वाटत नाहीं आणि तुमच्या कामुकपणाचीं स्तुतिस्तोत्रें मजपुढें तुम्ही गातां, काय ह्मणावें तुम्हाला? स्वतःच्या पांढऱ्या केसाकडे थोडें लक्ष द्या—माझा केशकलाप अद्याप काळाभोर आहे, मी अद्याप तरुण आहे, अल्लडपणाचे माझे दिवस अद्याप गेलेले नाहींत, मला जें कळतें तें आपल्याला कळूं नये?—कांहीं लाजलज्जा धरा—कैकेयीचें समाधान विलासी बोलण्यानें होणारें नाहीं. भयंकर दुःख मी सोशीत असतांना तुह्मांला विलासाची आठवण कशी होते?

**दश०**—हा विलासी दशरथ तुझी सेवा करायला तयार असतांना कोण तुला दुःख देत आहे ? माझे पांढरे झालेले केसहि तुझ्या आसक्तिशिवाय दुसरें तिसरें सुख जगांत आहे असें मानण्यास तयार नसतांना तुझ्या विलासी हौसेच्या आड उभा रहाण्यास कोण धजणार आहे ? सांग, कैकेयी, तुला कोणी झिडकारून बोललें आहे काय ? सांग, कैकेयी, तुला कोणी वैरी आहे काय ? देवकार्याहूनहि तुझ्या विलासांना अधिक श्रेष्ठ मानणारा हा दशरथ तुला झिडकारणारांची खोड मोडल्यावांचून राहाणार नाहीं, तुझा अपमान करणारांना तुझ्या पायांवर लोटांगण घालावयास लावल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहीं, तुझ्या वैऱ्यांना यमसदनाला पाठवून तुझ्या विलासांची सत्ता निष्कंटक केल्याशिवाय माझ्या धनुष्यबाणांना कधींहि विश्रांति मिळणार नाहीं. तुझा आवडता दशरथ पांढऱ्या केसांचा असला तरी आजहि तरुणांतला तरुण धनुर्धर आहे, हें विसरूं नकोस—घे, तुझ्या वैऱ्याचें नांव घे, त्याचा शिरच्छेद प्रथम करीन आणि नंतर तुझ्या दर्शनाला येईन, असें तुला रामाची शपथ घेऊन वचन देतों—

**कैके०**—रामाची शपथ घेऊन—रामाची शपथ—माझ्या लावण्याचे पोवाडे खोटेच ह्मणायचे—रामाची शपथ—

**दश०**— तुझ्या लावण्याची शपथ घेऊन वचन देतों—घे, तुझ्या वैऱ्याचें नांव घे, क्षणांत तो मृत्यू पावलाच म्हणून समज—तुझ्या लावण्याची शपथ, कैकेयी, तुझ्या लावण्याची शपथ—

**कैके०**—कशाला ही शपथेची यातायात ?—मला कोणी झिडकारून बोललें नाहीं, माझ्या अपमानामुळें मी दुःखीकष्टी नाहीं, किंवा कोणा वैऱ्याला ठार मारण्याचेंहि माझ्या मनांत नाहीं.

**दश०**—मग तुझ्या दुःखाचें कारण काय ? तुला आवडणारी कोणती वस्तु असून ती तुला मिळाली नाहीं, असें झालें असलें तर तसें सांग. कैकेयी, तुझ्या लावण्याला दुष्प्राप्य असें कांहीं नाहीं. कोसल, कैकेय, मिथिल, अङ्ग, वङ्ग, दक्षिणपथ, सर्व राष्ट्रांतील राजलक्ष्मीची मालकीण तूं आहेस.

ह्या समुद्रवलयांकित पृथ्वीनें आपल्या पोटांत तुला आवडणारा एखादा हिरा लपवून ठेवला असला तर ह्या दशरथाला आज्ञा कर, एका बाणानें पृथ्वीला दुभंगून पृथ्वीच्या पेटींतलें रत्न तुझ्या हातावर ठेवतों—तुला आवडणारा मोत्यांचा एखादा सर समुद्रानें तसाच दडवून ठेवला असला तर तसें मला सांग, चोरीच्या मालासकट समुद्राला चोराप्रमाणें तुझ्यापुढें उभा करतों.—तुझा मत्सर करणाऱ्या इंद्रसभेंतल्या अप्सरांनीं सर्व देवांचें पुण्य खर्चून एखादा नवा अलंकार जर तयार केला असला तर ती बातमी कळीव, माझ्या कैकेयीनें त्या अलंकाराचा उपभोग घेण्यापूर्वी तुझ्या अप्सरा तो अलंकार अंगावर कसा घालतात म्हणून इंद्राला जाब मी विचारतों.—तुझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली आणि तत्क्षणीं ती पुरवली नाहीं, कैकेयी, रामाची शपथ तुझी पाहिजे ती हौस ह्या क्षणीं मी पुरवितों—रामाची शपथ—

कैके०—पुन्हां रामाची शपथ—जाऊं द्या तें—माझें दुःख नाहींसें करण्याचें वचन मला दिलें ना? आपण सत्यप्रतिज्ञ व्हावें, वचन पाळावें आणि माझें दुःख नाहींसें झाल्यावर मी आणि आपण विलासाशिवाय इतर कांहीं करूं नये, अशी माझीहि इच्छा आहे.

दश०—सांग, तुझें दुःख सांग, क्षणांत तुला दुःखमुक्त करतों. रामाची शपथ, तुझ्या लावण्याची शपथ, क्षणांत तुला दुःखमुक्त करतों—दिलें हें वचन तुला, दिलें हें वचन तुला, त्रिवार दिलें हें वचन तुला.

कैके०—ऐकावें महाराज. देवदैत्यांच्या लढाईच्या वेळीं मी आपलें सारथ्य केलें, आपले प्राण वांचविले, आणि रथाचा कणा हातांत धरून ठेवून आपल्या पदरीं यश टाकलें. त्या सेवेबद्दल दोन वर आपण मला दिले आहेत; ते वर आज मागून घेण्याचें मी ठरविलें आहे. आपलें वचन आपण खरें करणार ना? माझे वर मला देणार ना? सत्यप्रतिज्ञ म्हणून रघुकुलाची कीर्ति कायम ठेवणार ना?

दश०—रघुकुलांत मी एकटाच खोटा कसा होईन? रघुकुलांत सर्वांनीं आपलीं वचनें पाळलीं आहेत; हा दशरथ कामातुर असला तरी खोटा नाहीं.

माझा कामुकपणाच म्हणजे सत्य होय, असें मी म्हणतों; दिलेले वर जर मी पुरे केले नाहींत तर माझ्या कामुकपणांत, रामाची शपथ, रामच शिल्लक राहाणार नाहीं-तुझ्या लावण्याची शपथ-माझ्या कामुकपणांत सौंदर्यच शिल्लक राहाणार नाहीं. तुला दोन वर मी दिलें आहेत ते आज पुरें करतों-मागायचें असेल ते मागून घे यावेळीं--

**कैके०**— पहिल्या वरानें मी मागतें, रामाच्या राज्याभिषेकाकरितां गोळा केलेल्या सामुग्रीनेंच उदईक माझ्या भरताचा राज्याभिषेक व्हावा आणि भरताला अयोध्येच्या सिंहासनावर बसवावें-ऐका महाराज, नीट शांत चित्तानें ऐका-दुसऱ्या वरानें मी मागून घेतें, उदईक पुष्यनक्षत्राच्या मुहूर्तानें रामानें वनवासाला जावें आणि चौदा वर्षें-दहा आणि चार-चौदा वर्षें वल्कलें नेसून, जटाधारी होऊन, तपस्वी ऋषींच्या रहाणीनें चौदा वर्षें-दहा आणि चार-चौदा वर्षें रामानें दंडकारण्यांत काढावीं.

**दश०**—चांडाळणी, काय मागितलेंस हें ! रामाला वनवास ! माझा राम वल्कलें नेसणार ! वस्त्रालंकारांनीं भरलेल्या हजारों पेट्यांतून आवडीचीं वस्त्रें व आवडीचे अलंकार ज्या माझ्या रामाकरितां बाहेर काढतांना शेंकडों दासदासींचे हात दमून जातात, तो माझा राम, वल्कलें नेसणार !-माझी पूर्वजन्मींचीं तूं वैरीण असली पाहिजेस-कसा दावा साधलास !-रामानें वल्कलें नेसलेलीं पाहण्याला माझे डोळे उघडे कसे राहतील !-ज्या माझ्या रामासाठीं पक्वान्नें तयार करण्याकारितां कुशल सिद्धपाक नेमावे तितके थोडेच होत आहेत, तो माझा राम कंदमुळांवर अरण्यांत दिवस कंठणार !-कैकेयी, राक्षसीण आहेस, तूं राक्षसीण आहेस-राम कंदमुळें खाऊन ऋषींच्या राहणीनें राहात असतांना तुझ्या अधरपानांत ह्या दशरथाला गोडी कशी शिल्लक राहाणार !-कैकेयी काय मागितलेंस हें !-हिऱ्यामोत्यांनीं झळकणाऱ्या सोन्याच्या मंचकावर ज्या माझ्या रामानें निजावें, तो माझा राम अरण्यांत जटेची उशी करुन निजल्यावर हा दशरथ जमिनीवर शरीर टाकून प्राण सोडल्यावांचून कसा राहील ! [ मूर्छित पडतो.

**कैके०**—काय झालें हें! भलतें सलतें नाहीं ना कांहीं झालें! महाराज डोळे उघडून आपल्या आवडत्या कैकेयीकडे पहा, नीट विचार करा, उगीच आपल्या जिवाला कष्टवूं नका—आपल्या आणि माझ्या विलासाच्या सुखाकरितांच हे वर मागितले आहेत हो! आपण आपल्या जिवाला त्रास करून घेतल्यानंतर या कैकेयीचें काय होईल?—आपणांला दुःखीकष्टी करून मी सुखी कशी होईन?—एकमेकांचे जीव प्रेमरज्जूंनीं घट्ट बांधले गेले आहेत हो महाराज—आपण सावध व्हावें आणि मलाहि सावध करावें—माझाहि जीव व्याकूळ होऊं लागला, गडे, लवकर सावध व्हावयाचें होतें. [ मंथरा येते.

**मंथ०**—कैकेयी, हें तूं ह्यावेळीं काय बरळते आहेस? अशी कावरीबावरी कां झाली आहेस?—तुझा धीर सुटला कीं काय? झंझावात सुटला तरी पर्वत जसा हालत नाहीं,—तसा तुझा निश्चय ह्यावेळी डगमगतां कामा नये—

**कैके०**—महाराजांना मूर्च्छा आली आहे, मग मी कसें ग करूं! ज्या वृक्षाला प्रेमानें वेढून मी बसलें आहे तो वृक्षच जर मुळासकट उपटून पडला तर ही लता तरी कशी जमिनीवर कोसळल्यावांचून राहील? पाण्या-वांचून मासा जसा जिवंत राहत नाहीं, तसें ह्याच्या विलासावांचून मला कसें जिवंत राहातां येईल? मंथरे, यांना प्रथम सावध करूं या ग—

**मंथ०**—होतील आपोआप सावध होतील—क्षणांत शुद्धिवर येतील—काळजी करूं नकोस— सूर्याच्या तापानें समुद्राचें पाणी तापलें तरी समुद्र अटत नाहीं आणि माशांवर तडफडण्याचा प्रसंगच येत नाहीं—महावृक्ष झंझावातानें मोडून पडतो अहिसा लतेला नुसता भास होतो, पण हे हेलकावे एकदा निश्चयानें लतेनें सोसले म्हणजे लतेलाच वृक्षाचें माहात्म्य प्राप्त होतें—मन घट्ट कर आणि डोळ्यांना कांहींहि दिसलें तरी आपला हट्ट सोडूं नकोस. प्रहराभराची कळ सोस, दशरथ, राम, कौसल्या तुझ्या हातांतलें बाहुलें होऊन बसतील—काळजी करूं नकोस, मी आतां आणतें महाराजांना शुद्धि-वर—महाराज, सावध व्हायचें होतें. कैकेयीदेवी जवळ उभ्या आहेत—

काळजी करूं नकोस–कांहीं त्यांना होत नाहीं–उघडतील डोळे आपोआप–भरताची मूर्ति डोळ्यापुढें ठेव–

कैके०—त्यांना कांहीं नाहीं ना होणार ?

मंथ०—कांहीं होणार नाहीं–अग पुरुषांना असल्या संवयीच असतात–भाबड्या बायकांना भिववण्याकरितां पुरुष असला त्रागा करीत असतात–महाराज, यायचें शुद्धिवर, कैकेयीदेवी जवळ असतांना जिवाला उगीच त्रास काय म्हणून करावयाचा–भिऊ नकोस–इतक्यांत येतील शुद्धीवर–

कैके०—भिती वाटते–मी जर महाराजांना यावेळीं प्रेमानें आलिंगन दिलें तर लगेच येतील शुद्धिवर–देऊं का आलिंगन ?

मंथ०—वेडी कुठली ?–आज नको देऊं आलिंगन–भरताला राज्याभिषेक होऊं दे, राम वनवासाला जाऊं दे, तुझी सवत मातीला मिळूं दे, मग दे आलिंगन–तुझ्या पिंजऱ्यांत राघू कायमचा राहील, तू घालशील तें अन्न खाईल आणि तूं बोलवशील तसें बोलेल—

कैकै०—पण बाई हे लवकरच शुद्धिवर येऊं देत–महाराज, आपली आवडती कैकेयी जवळ उभी आहे–यायचें लवकर शुद्धिवर—

मंथ०—मी आणतें त्यांना शुद्धिवर–तुझ्या नांवाचा मंत्र ह्यावेळीं लागूं व्हायचा नाहीं–मी क्षणांत आणतें शुद्धिवर–धीर सोडूं नकोस–नाहींना धीर सोडणार ?

कैके०—त्यांच्या जीवाला कांहीं अपाय नसला मग मी बिलकूल धीर सोडणार नाही–ते शुद्धिवर येऊं देत, हट्टाहट्टानें वर मागून घेते–ते एक शब्द बोलले तर मी दोन शब्द बोलीन–कचरणारी ही कैकेयी नाहीं–पण त्यांना लवकर शुद्धिवर आण–माझ्या जिवाला तळमळ लागली आहे—

मंथ०—भिऊं नकोस–आतां आणतें शुद्धिवर–भिऊं नकोस–अग हा पुरुषाचा देहस्वभाव आहे–प्राण देतो म्हणून बायकांचें सौभाग्य नष्ट करण्याच्या असल्या धाकाला भीक घालूं नकोस–तुझा निश्चय कायम आहे ना ?

**कैके०**—आहे कायम–त्यांना शुद्धीवर आण मग मी त्यांना कशी धिक्कारून बोलतें तें पहा.

**मंथ०**—क्षणांत माझ्या मंत्रानें मी महाराजांना शुद्धिवर आणतें. महाराज, देव रामचंद्र आपल्या दर्शनाला यावयाला निघाले आहेत–देव रामचंद्र–देव रामचंद्र–देव रामचंद्र–उघडले पहा महाराजांनीं डोळे–देव रामचंद्र आतां इतक्यांत इथें येतील–सावध व्हायचें होतें–हो देव रामचंद्र–महाराजांचा आवडता रामच–झाले महाराज सावध–[दशरथ सावध होतो.

**दश०**—कोठें आहे माझा राम–आला ना माझा राम–दंडकारण्यांत तर गेला नाहीं ना ? धाडलास तूं दंडकारण्यांत माझा राम–कैकेयी काय केलेंस हें !–कशाला मी शुद्धिवर आलों ?

**मंथ०**—आतां इतक्यांत देव रामचंद्र येथें येऊन पोंचतील, वर्दी द्यायला मी पुढें आलें आहे.

**दश०**—इतक्यांत येईल ना माझा राम ?

**मंथ०**—हो, इतक्यांतच येतील.

**दश०**—जा, आल्याबरोबर आंत घेऊन ये. [ मंथरा जाते ] कैकेयी, तूं आज इतकी निष्ठुर कशी झालीस ? भरताला राज्य मागितलेंस, तुझ्या सवतीमत्सराचा अर्थ मला समजला–पण रामाला वनवास काय ह्मणून ? मी कोणचें दुःख दिलें ह्मणून मला ही शिक्षा ? रामानें कोणचा तुझा अपराध केला? अग, माझा राम भरताला इतर सर्वांहून अधिक प्रिय मानतो, कौसल्येहून तुझी पूजाअर्चा माझा राम अधिक करतो. अयोध्येंत असा प्राणी नाहीं ज्याचें मन रामानें दुखविलें आहे, अयोध्येंत असें दुःख नाहीं जें माझ्या रामानें हलकें केलेलें नाहीं, अयोध्येंत असें सुख नाहीं जें माझ्या रामामुळें प्रफुल्लित झालेलें नाहीं, अयोध्येंत असा पराक्रम नाहीं ज्याचें तेज माझ्या रामामुळें चोहोंकडे फाकलेलें नाहीं, अयोध्येंत असा मोक्ष नाहीं ज्यांत माझ्या रामाची मूर्ति प्रत्यक्ष नाहीं.–अशा माझ्या रामाला, कैकेयी, वनवासाला कां पाठवितेस ?

**कैके०**—द्यायचे असले तर माझे वर मला द्यावेत, नाहींतर नाहीं म्हणून सांगावे-आढेवेढे कशाला? वचनभंग करून रघुकुलाचा अधःपात खुशाल करा.

**दश०**—वचनभंग मी करीत नाहीं, तूं करायला लावते आहेस-तूं रोजची कैकेयी नव्हेस-शंबर दैत्य-मी मारलेला इंद्राचा वैरी शंबर दैत्य-कैकेयी तुझ्या अंगीं ह्या वेळीं संचरलेला दिसत आहे-तो वैरी बोलतो आहे, कैकेयी, तूं बोलत नाहींस. कैकेयी, शंबर दैत्याला मी वर दिलेले नाहींत; तुला दिले आहेत. माझ्या लाडक्या कैकेयीला वर दिले आहेत, माझ्या विलासांत मोक्ष मानणाऱ्या ह्या त्रैलोक्यसुंदरीला मी वर दिले आहेत—

**कैके०**—अशा बोलण्यानें मी आतां फसणार नाहीं. माझे वर मला दिले पाहिजेत, नाहीं तर खोटा ह्मणून रघुकुलाच्या पूर्वींच्या सर्व पिढ्यांसकट नरकांत पडण्याची तयारी केली पाहिजे.

**दश०**—तुझ्या भरताला अयोध्येचें राज्य पाहिजे ना? उद्यां सिंहासनावर बसलेल्या रामाकडून अयोध्येचें राज्य मी भरताला देववितों, माझा राम नाहीं म्हणायचा नाहीं-रामाला वनवासाला पाठवूं नकोस-मी तुझ्यापुढें पदर पसरतों, मी तुझ्यापुढें हात जोडतों, कैकेयी, मी तुझे पाय धरतों, ( पायां पडून ) रामाला वनवासाला पाठवूं नकोस.

**कैके०**—दुबळ्यासारखी भीक काय मागतां? नामर्दासारखे गयावया काय करतां? नेभळ्याप्रमाणें पाया काय पडतां? मी तुह्मांला कितीहि वश असलें तरी कणखरपणाला तुह्मीं सोडलेंत ह्मणजे मीहि तुह्मांला सोडलें ह्मणून समजा-( दशरथ उठतो ) वीराप्रमाणें उभे रहा आणि माझे वर मला द्या. लेच्यापेच्यांच्या नादीं बायका लागत नसतात-खंबीर व्हा आणि माझे वर मला द्या.

**दश०**—रामाला वनवासाला पाठवून तूं माझा प्राणच माझ्या शरीरांतून बाहेर पाठवीत आहेस—

कैके०—खंबीर मन करा ह्मणजे प्राण बाहेरबिहेर कोठें जात नाहीं—प्रतिज्ञा पाळण्यासाठीं दुःख सोसलेंच पाहिजे—वचनभंग होऊं नये म्हणून सत्याची चाड असलेल्यांनीं आपल्या शरिराचा बळी दिला आहे, पण कधींहि दान परत मागितलेलें नाहीं.—शैब्य राजानें कपोताला आपल्या शरीरांतलें सर्व मांस खाऊं दिलें, अलर्कानें आपले डोळे याचकाला काढून दिले, समुद्रानें वचन दिल्यावर आपली मर्यादा कधींहि सोडली नाहीं, ह्या कथा आपणच मला ऐकवल्या आहेत ना ? लचके लचके घेऊन मी कांहीं आपल्या शरिरांतलें सर्व रक्त आणि मांस हिसकावून घेत नाहीं, आपले डोळे फोडीत नाहीं, किंवा वृद्धावस्थेची आपली मर्यादा पाळा असाहि हट्ट धरीत नाहीं.—आपण मला पाहिजेत—निष्कंटक पाहिजेत—कोणाच्याहि नादानें माझ्यापासून दूर होणार नाहीं असे महाराज पाहिजेत—माझ्या एकटीचेच पाहिजेत—म्हणून भरताला राज्य आणि रामाला वनवास.—यांत कसलें हो संकट ? अजून चौदा वर्षें आपण व मी विलासांत घालवूं; माझ्या मनाला भीति राहूं नये म्हणून राम जाईना चौदावर्षें वनवासाला—आपल्याला दुःख होण्यासारखें मीं काय मागितलें आहे ?—रामाचें वेड तुह्मांला इतकें असल्यावर भरताला राज्यावरून तुह्मींच खालीं केव्हां ओढाल याचा काय नेम ? रामाचा निदिध्यास तुह्मांला इतका लागल्यावर तुमच्या कामुकपणांत मला मोक्ष कोठून दिसणार ? राम वनवासाला गेल्याशिवाय मी निर्भय नाहीं, मला प्रथम निर्भय करा आणि मग माझ्या विलासांत मोक्ष पाहून घ्या—महाराज, राम वनवासाला गेलाच पाहिजे.

दश०—कामुका दशरथा, कामुकपणांत कोठला धर्म, कोठला देव आणि कोठला मोक्ष ?—मला सावध केलेंस कैकेयी, मला सावध केलेंस.—अज, दिलीप, रघु ह्या कामुकाला हंसतील; पूर्वजानों, हंसूं नका, हा दशरथ आतां सावध झाला आहे—कैकेयीच्या विलासांत हा दशरथ मोक्ष पहात नसून रामांत मोक्ष पहात आहे —कैकेयी, मी तुला साफ सांगतों, वनवासाला जा, असे शब्द माझी जीभ रामापुढें कधींहि उच्चारणार नाहीं.—प्रतिज्ञेचा भंग करण्याच्या नरकांत मी पडलों तरी चालेल, तुझ्या विलासाला मी मुकलों

तरी चालेल, फार काय रामानें मला दूषण दिलें तरी चालेल, दंडकारण्याचा मार्ग मी रामाला दाखविणार नाहीं.

कैके०—असाच जर आपला हट्ट असेल आणि माझे वर मला द्यावयाचे नसतील तर जमिनींत खड्डा खणून मला जिवंत गाडा, पाण्यांत बुडवून मला ठार मारा, किंवा रामाच्या राज्याभिषेकाच्या वेळीं आगींत माझें भस्म करा.–रामानें वनवासाला गेले पाहिजे किंवा मी तरी मेले पाहिजे—

दश०—चांडाळीण, राक्षसीण,–दावा साधते आहे दावा–विषारी नागीण माझा प्राण घेऊं पाहते आहे माझा प्राण–कैकेयी, तुझ्या वराप्रमाणें राम उद्यां वनवासाला गेल्यावर मी जिवंत राहणें शक्य नाहीं–त्या स्थितींत जर भरत सिंहासनावर बसला तर भरतानें किंवा कैकेयीनें मेलेल्या दशरथाला तिलांजलि देतां कामा नये.–तूं माझी कोणी नव्हेस आणि मी तुझा कोणी नव्हे–तुला वर दिले आहेत ही गोष्ट खोटी नाहीं—

कैके०—मग सत्य पाळा–वचन पाळा–खोटे कां होतां?

दश०—वनवासाला तूं जा, असे शब्द कधींहि रामापुढें माझी जिभ उच्चारूं शकणार नाहीं. कैकेयी, तुला काय करायचें असेल तें कर–वर दिले आहेत, पण रामाला वनवासाला जाण्याची आज्ञा–नाहीं माझ्या तोंडांतून तसे शब्द यापुढें कधींहि निघणार नाहींत–कर, तुला काय करायचें असेल तें खुशाल कर.

कैके०—पुरुष पुरुषाप्रमाणें वागेनासे झाले ह्मणजे बायकांनीं तरी स्वतःचा प्राण देण्याशिवाय दुसरें काय करायचें असतें! नेभळटाची बायको होण्यापेक्षां मेलेलें काय वाईट! राम येथें यावयाचे आंत विष पिऊन मी प्राण देतें.–माझे डोळे मिटल्यावर सवतीच्या मुलाची राज्याभिषेकाची मिरवणूक खुशाल काढा.–आण ग मंथरे, विषाचा पेला आण आणि महाराज आपल्या हातानें तें विष कैकेयीला पाजून कृतार्थ व्हा.–आण ह्मणतें ना विषाचा पेला–मंथरे–आण लवकर, आण ह्मणतें ना लवकर विषाचा पेला–आण लवकर— [ मंथरा येते.

मंथ०—आणला राम, महाराज, आपला राम आला. [राम येतो.

**राम०**—बाबांच्या चरणांचें अभिवंदन राम करीत आहे-(तसें करतो) मातोश्रीच्या चरणाचें अभिवंदन राम करीत आहे-(तसें करतो) आज हा काय चमत्कार! बाबांच्या पायांचें अभिवंदन केल्यावर बाबांनीं मला आशीर्वाद दिला नाहीं, असें कधींच झालें नाहीं; पण आई, आज बाबा असे स्तब्ध कां? माझ्या मस्तकावर अभयहस्त कां टेवला नाहीं?—अशी दुःखी कष्टी बाबांची मुद्रा कां?- आई, बाबांना कोणचें दुःख होत आहे? बाबा कितीहि रागावले असले तरी हा राम बाबांच्या दृष्टीस पडण्याबरोबर बाबांचा राग शांत होतो, अशी आजपर्यंतची ख्याति आहे; मग आजच हें असें कां! बाबांचें दुःख मला पाहतांच नाहींसें होतें, असें आई तूं कित्येक वेळां बोलून दाखविलें आहेस; मग आज मला पाहिल्यावर बाबांचें दुःख अधिकच वाढून बाबा चिंताग्रस्त कां दिसत आहेत? माझ्या पितृभक्तीला बट्टा लागेल अशी चूक, आई, माझ्या हातून कांही झाली आहे काय?

**कैके०**—रामा तुझ्या हातून कांहीं चूक झालेली नाहीं—पण—पण—

**राम०**—आई, बोलतांना तूंहि अशी अडखळतीस कां? बाबा असे स्तब्ध कां?-दुःखाचे अश्रु बाबांच्या डोळ्यांत! काय झालें आहे बाबांना, आई, सांग ना लवकर?

**कैके०**—त्यांना काहीं झालेलें नाहीं, आणि रामा, तुझ्या हातूनहि कांहीं चूक झालेली नाही-पण रामा, पण—

**मंथ०**—चूक कदाचित् होईल, म्हणून भीति कैकेयीदेवीला वाटत आहे.

**राम०**-ज्या गैर वर्तनाची भीति मातोश्रींना वाटत असेल त्याचा नुसता उच्चार मातोश्रीनीं करावा—मला नुसतें तसें सुचवावें पाहिजे तर—त्या भीतीचें निराकरण क्षणांत हा राम केल्यावांचून राहणार नाहीं. आई, तुझे चरण म्हणजे अत्यंत पवित्र तीर्थ मला होत; बाबा, आपल्या पायांचें दर्शन म्हणजे मूर्तिमंत सत्याचें दर्शनच मला होय.—आई, तुझी आज्ञा शिरसावंद्यच ह्या रामानें मानली नाहीं असें कधीं तरी झालें आहे काय? बाबा, आपल्या मुखांतून शब्द निघाला आणि ह्या रामानें तो शब्द सत्य करुन दाखविला नाही, असें कधीं तरी झालें आहे काय! सत्यप्रतिज्ञ रघुकुलांतील

सत्याच्या ह्या प्रत्यक्ष अवताराचा मी राम मुलगा आहे; बाबा, दोन शब्द माझ्याशीं बोला आणि माझ्या पितृभक्तीची परीक्षा पहा-आपला प्रत्येक शब्द जर ह्या रामानें खरा केला नाहीं तर राम पितृभक्त कसला ? बाबा, बाबा, असेंच मजकडे पहा आणि दोन शब्द बोलून ह्या आपल्या आवडत्या लेकराला कृतार्थ करा. (राम पाय धरायला जातो, दशरथ त्याला पोटाशीं धरतो) बाबा, सांगाना मला आपणाला काय झालें आहे तें ?

**दश०**—नाहीं रे बाळ माझ्या हातून कांहीं बोलवत नाहीं.[पुन्हां स्तब्ध.

**राम०**—हें काय आई, बाबा मला आज्ञा करतील असें तूं तरी कर-बाबांचें दुःख मला सांगना लवकर ?

**मंथ०**—ज्या दुःखावर औषध नाहीं तें दुःख बोलून दाखविणें जिवावर येतें-कैकेयीदेवी तरी काय बोलणार ?.

**राम०**—राम सर्व दुःखावर औषध आहे-बाबा, आपलें दुःख हलकें करण्याकरितां अग्नींत उडी घ्यायला ह्या रामाला सांगा,क्षणांत अग्नीला माझा देह मी अर्पण करतों-समुद्रांत बुडी मारायला मला आज्ञा करा, समुद्रांतील माशांना ह्या शरिराचें मांस खाऊं घालून पित्याचा शब्द मी खरा करतों-ह्यां रामाला स्वतःचें शिर बाणानें छेदून पितृचरणीं अर्पण करायला नेत्रसंकेतानें खूण करा बाबा, तसें सुचविणारी आपली दृष्टि आपल्या चरणाकडे वळण्याबरोबर हें चरणतीर्थ माझ्या शरिरानें झाकलेलें पहावयास मिळेल-बाबा कोणतीहि चिंता करूं नका आणि ह्या रामाला आपली आज्ञा ऐकवा. (दशरथ कपाळावर हात ठेवतो.) आई, मी दुर्दैवी, बाबा मजशीं बोलूं इच्छीत नाहींत, आई तूं तरी बाबांचें मनोगत मला कळीव.

**मंथ**—भरताला कैकेयीदेवीनें सर्व कांहीं सांगितलें असतें; पण बाई देव रामचंद्राला—

**राम०**—आई, तुझा भरत मी आहें; भरतापेक्षां मी जर तुझी आज्ञा तात्काळ ऐकली नाही तर माझी पितृभक्ति खोटी असा माझ्या नांवाला काळिमा लागूं दे. बाबांची आज्ञा आई,तुझ्या तोंडून ऐकण्यास मी उत्सुक आहें.

कैके०—माझा हक्क त्यांच्यावर आहे; रामा, तुझ्यावर माझा हक्क आहे असें मी कसें ह्मणूं ?

राम०—आई, भरतावर जो तुझा हक्क आहे तोच माझ्यावर आहे—

मंथ०—जें सत्य पतीला संकटाचें वाटतें तेंच सत्य पुत्रालाहि संकटाचें वाटणार नाहीं कशावरून ? तशांत सवतीचा मुलगा—

राम०—सवतीचा मुलगा—आई, सवतीचा, सवतीचा मी मुलगा हीच भीति तुझ्या मनाला डंवचत आहे ना ? हीच तुझी भीति बाबांच्या मनाला त्रास देत आहे ना ? सवतीचा मुलगा—मी सवतीचा मुलगा नाहीं—तुझा मुलगा आहें—सवतीचा मुलगा—आई, माझ्या मनाला, माझ्या बुद्धीला हा भेद माहीत नाहीं—शरिरावर हा आळ आलेला आहे हें खरें—

कैके०—सर्व लोक तसेंच मानतात—मी तरी—तरी—

मंथ०—सर्व जगाहून निराळी कैकयी देवी कोठें आहे ?

राम०—शरिरावरचा हा आळ काढून टाकण्यास मी काय केलें पाहिजे, तें आई तूं मला सांग—ह्या क्षणीं तुझ्या इच्छेप्रमाणें वागून भरत आणि राम ह्यांत फरक नाहीं, असें तुझ्या अनुभवाला प्रत्यक्ष आणून देतों.—सांग, सांग लवकर मी काय करूं तें ?—आई, तूं स्तब्ध कां ?—बाबा, आपण अधिक व्याकुळ कां ?—आई, माझ्या शब्दावर तुझा विश्वास कसा बसत नाहीं ?

कैके०—सांगून सवरून, हडसून खडसून, सर्वांना जाहीर करून दिलेलीं वचनें पाळण्याचें रघुकुलांतल्या ह्या मूर्तिमंत सत्यावताराला संकटाचें जेथें वाटतें, तेथें तेंच सत्य रामा, तुझ्याकडून कसचें पाळलें जाणार ?

मंथ०—एकदां ठेंच लागल्यावर मन साशंक होतें—

कैके०—जो अन्धकार सत्याचा फैलावा करतानां दहा रथांत बसलेल्या उगवल्या सूर्याला प्रेमाच्या किरणांनीं नाहींसा करतां येत नाहीं, तोच अंधकार सूर्यतेजापासून पेटविलेल्या नव्या दिव्याला—

मंथ०—सूर्यानें दगा दिल्यावर दिव्यावर विश्वास कोण ठेवणार ? एकवचनी ह्मणून दिव्याची कितीहि ख्याति असली तरी दिवा तो दिवा आणि सूर्य तो सूर्य—

**राम०**—बाबा सत्याचे मूर्तिमंत अवतार आहेत; त्यांच्यापुढें मी कांहींच नाहीं, हें खरें आहे. राम एकवचनी आहे, पण ह्या रामावर दशरथ महाराजांपेक्षां तुमचा विश्वास बसलाच पाहिजे, असें मी कसें ह्मणूं ?—आई मी तुझें चिमुकलें बाळ आहें, पण चिमुकल्याच्याहि प्रत्यक्ष कृतीवर विश्वास ठेवण्यास कोणची हरकत ? आई, ज्या सत्यावर सर्व विश्वाची उभारणी झालेली आहे आणि ज्या सत्याच्या तपश्चर्येवर विश्वाची जोपासना अवलंबून आहे, तें सत्य इतकें सोपें आहे की सत्याच्या पालनाकरितां दशरथ महाराजासारख्या नामांकित वीरांनींच कंबरा कसल्या पाहिजेत, असें मुळींच नाहीं.—बाबांच्या तेजापुढें राम ह्मणजे एक काजवा आहे—पण सत्याचें पालन काजवाहि सहज करूं शकतो.—शरिराच्या अखेरच्या आहुतीहून अधिक कांहीं मागण्याची ताकद सत्यांतहि नाहीं. सूर्याचा पराक्रम मोठा, पसारा अमर्याद, आणि विश्वकल्याणाच्या सूर्यानें उभारलेल्या राशी पर्वतासारख्या—ह्या सर्वांचा त्याग करून सत्याला शरीर अर्पण करणें सूर्याला जिवावर येतें—आई, बाबांच्यापुढें मी काजवा आहें. संसाराला आतां कुठें मीं आरंभ केला आहे. काजव्याला आपल्या शरिराचा आणि आपल्या संसाराचा यज्ञ निश्चयाचें बल असल्यावर तेव्हांच करतां येतो.—बाबांना जें संकटाचें वाटतें तें ह्या चिमुकल्या रामाला मुळींच संकटाचें नाहीं.—मी चिमुकला म्हणूनच मी सत्याचें पालन सहज करूं शकेन, ही खूणगांठ आई, तूं मनाशीं बांध आणि मला आज्ञा कर—

**मंथ०**—पाहायची होती पाहिजे तर रामाची परीक्षा.

**कैके०**—रामा, माझा हक्क तुझ्यावर नाहीं, ह्यांच्यावर आहे. पण तुझा आग्रहच असेल तर तुला सत्याचें पालन करायला मी सांगतें.—तुझा आग्रह आहे ना तसा ? माझा हक्क नाहीं; पित्याकरितां पुत्रानें सत्याचें पालन केलें पाहिजे असा हट्ट मी भरतापाशीं धरला असतां—रामा, तुझ्यावर माझा हक्क नाहीं.

**राम०**—आई, माझ्यावर तुझा हक्क आहे.—आई, मनांत शंका येऊं देऊं नकोस.—आई, हा एकवचनी राम तुला वचन देत आहे, तुझें ह्मणणें ह्या

क्षणीं मी खरें करून दाखवीन.-जीं जीं वचनें बाबांनीं तुला दिलीं असतील, त्या त्या वचनाप्रमाणें हा एकवचनी राम ह्या क्षणीं वागून दाखवील.-दुसऱ्या कोणत्याहि नात्यावर तुझा विश्वास नसला तरी एकवचनी ह्मणून मी तुला वचन देत आहे, आई बाबांच्यापाशीं जें जें मागितलें आहेस आणि जें पुरें करणें बाबांना संकटांचें वाटत आहे तें तें सर्व हा एकवचनी राम ह्या क्षणीं पुरें करायला चुकायचा नाहीं —

कैके०—त्रिवार वचन पाहिजे—

राम०—आई, बाबांच्यापाशीं जें जें तूं मागितलेंस आणि जें देण्याला बाबांचें मन कचरत आहे तें तें सर्व ह्या क्षणीं मी तुला देऊन टाकतों; आई, हा एकवचनी राम त्रिवार तुला वचन देत आहे, बाबांच्यापाशीं जें जें तूं मागितलेंस तें तें सर्व ह्या एकवचनी रामानें ह्या क्षणीं तुला दिलें आहे.-पितृभक्तीचें ह्या लेकराचे लाड मातोश्रींनीं ह्यावेळीं पुरविले पाहिजेत.

कैके०—पितृभक्त रामा, ऐक, एकवचनी रामा ऐक,-सत्यनिष्ठ रामा, ऐक.-शंबर दैत्याच्या युद्धाचे वेळीं मी सारथ्याचें काम करून महाराजांचे प्राण वांचविलें व महाराजाकडून शंबर दैत्याचा वध करविला; त्या पराक्रमाबद्दल महाराजांनीं मला दोन वर दिले आहेत—

राम०—हा वृत्तांत सर्वांना माहीत आहे.

कैके०—ते दोन वर आज मी मागून घेत आहें.

राम०—तें वर देण्याचें बाबांना संकटांचें वाटत असलें तर पितृभक्त रामानें बाबांच्याकरितां आज आई, तुला ते दोन वर देऊन टाकले आहेत.

कैके०—दिले आहेत ?

राम०—दिले आहेत, देऊन टाकले आहेत, त्रिवार दिले आहेत; वर मागून घे आई.

कैके०—पाहिल्या वरानें असें मीं मागितलें आहे आणि रामा तूं ते देऊन टाकले आहेस, तुझ्या आतांच्या अभिषेकाच्या सामुग्रीनेंच तुझ्या ऐवजीं रामा, भरताच्या मस्तकावर राज्याभिषेक व्हावा—

**राम०**—आई, ह्यांत मला आनंदच आहे. आई, वसिष्ठगुरुंना सांगून भरताला बोलवून आणून भरत अयोध्येच्या सिंहासनावर माझ्याऐवजी बसेल अशी मी आतां व्यवस्था करतों.—आई भरताकरितां राज्यच काय जानकीलाहि सोडतांना रामाला केव्हांहि दुःख होणार नाहीं.—आई, तुझा दुसरा वर कोणता ?

**कैके०**—दुसऱ्या वरानें असें मीं मागितलें आहे आणि एकवचनी रामा, तूं देऊन टाकलें आहेस, ज्या पुष्य नक्षत्राचे योगावर तुला अभिषेक व्हायचा होता त्याच पुष्य नक्षत्राचे योगावर रामा, तूं वनवासाला चौदा वर्षें—दहा आणि चार—चौदा वर्षें गेलें पाहिजे आणि दंडकारण्यांत वल्कलें नेसून ऋषींच्या राहणीनें चौदा वर्षें—दहा आणि चार चौदा वर्षें—रामा, तूं राहिलें पाहिजे.

**राम०**—आई, त्या क्षणापासून राम वनवासी झाला आहे आणि—चौदा वर्षें—दहा आणि चार—चौदा वर्षें दंडकारण्यांत ऋषीप्रमाणें वल्कलें नेसून ऋषींच्या राहणीनें रहाण्याचा मीं निश्चय केला आहे.

**दश०**—काय मी ऐकतों आहे हें !

**राम०**—बाबा, ह्या वनवासी झालेल्या रामाबद्दल दुःख करूं नका—जन्मापासून तुमचा राम तपस्वी आहे. अयोध्येचें सिंहासन आणि दंडकारण्यांतील वनवासाचें दर्भासन दोन्ही आपल्या रामाला सारखींच सुखाचीं आहेत.—आई, भरत अयोध्येंत आल्यावर, न्यायनीतीनें राज्य कर, असा ह्या वनवासी रामाचा निरोप भरताला सांग.—आई, रामाच्या धनुष्यबाणाच्या शक्तिसंबंधानें तुझ्या मनांत शंकाकुशंका येण्याचें कारण कांहींहि असो, वनाकडे फिरलेली रामाची दृष्टि मागें वळून त्या गोष्टीकडे पहाणार नाहीं, आणि ह्यापुढें माझ्या मनांत त्या संबंधानें विचार यावयाचे नाहींत. आई, भरतराज्य निष्कंटक रहावें आणि तुझ्या मनाला भीतीचा लवलेशहि शिवूं नये म्हणून प्रतिज्ञापूर्वक मी तुला सांगतों, रामाच्या धनुष्यबाणाचा उपयोग दंडकारण्यांत ऋषींच्या यज्ञयागाचा विध्वंस करणाऱ्या दैत्यांचा संहार करण्यापुरताच

होईल, आणि अयोध्येच्या राज्यलक्ष्मीच्या लोभानें रामाच्या ह्या धनुष्यावर कधींहि बाण चढणार नाहीं.—आई, बाबांना माझा वियोग सहन होईल आणि बाबांचें चित्त पुन्हां आनंदी होईल, अशीच बाबांशीं तूं वाग, एवढेंच तुझ्या ह्या लेकराचें तुझ्या पवित्र चरणांपाशीं मागणें आहे. ( कैकेयीच्या चरणावर मस्तक ठेवतो. ) आई, वनवासाची तयारी करण्याकरितां येथून जाण्यापूर्वी बाबा मजबरोबर प्रेमाचे दोन शब्द बोलतील काय ?—आई, तूंहि अशी स्तब्ध कां ? तुझा आशीर्वाद ह्या वनवासी रामाला आहे ना ! बाबा, दोन शब्द प्रेमानें अभिवंदन करणाऱ्या ह्या रामाशीं नाहीं काहो बोलवत ?

[ दशरथाचे चरणावर मस्तक ठेवतो.

**मंथ०**—मुलाच्याहि ऋणानें तेजस्वी पुरुष ओशाळल्यासारखे होतात. कैकेयीदेवीलाहि दोन विवेकाच्या गोष्टी सुचण्याची ही वेळ नव्हे.—ओशाळलेले महाराजांचें मन कांहीं काळ लोटल्यावर आपोआप ठिकाणावर येईल, आणि देवीच्या सेवेनें प्रसन्न होईल. तेव्हां इथें वेळ अधिक न घालवितां वनवासाची तयारी होईल तितकी लवकर करणें अधिक चांगलें नाहीं का !

**राम०**—आई, कौसल्या मातोश्रीचा निरोप घेऊन पुष्य नक्षत्रावर वनवासाला जातांना बाबांच्या व तुझ्या चरणांचें दर्शन घेण्याकरितां मी येथें येईन, त्यावेळीं बाबा मला आशीर्वाद देतील असें तूं कर—आई, वनवासाची तयारी करायला मी जात आहें. [ लक्ष्मण येतो.

**लक्ष्म०**—दादा, तुम्ही वनवासाला जाल, पण हा लक्ष्मण जाऊं देणार नाहीं. रघुकुलाच्या संप्रदायाला सोडून ज्येष्ठ पुत्राचे ऐवजीं दुसऱ्या कोणालाहि मी अयोध्येच्या सिंहासनावर बसूं देणार नाहीं. युद्ध करून ह्या प्रश्नाचा मी निकाल लावून घेईन आणि त्या युद्धांत लक्ष्मण मरून पडला तर वनवासाला जायला तुम्हाला मिळेल—

**राम०**—लक्ष्मणा, माझा पाठीराखा म्हणून तूं येथें उभा होतास—अशा संतापानेंच तूं का मला मदत करणार ! लक्ष्मणा, वनांतच विश्वामित्रांनीं

तुला मला अस्त्रविद्या दिली, वनांतच त्या विद्येचा पहिला उपयोग तूं आणि मी विश्वामित्राचे यज्ञाच्या वेळीं केला, त्याच अस्त्रविद्येची दिव्य शक्ति दंडकारण्यांतील ऋषींच्या संरक्षणासाठीं खर्च करण्याची आयती संधि मातोश्री कैकेयीनें मला आणून दिली असतां तुला क्रोध कां चढावा ?

**लक्ष्म०**—बाबा, युद्धानें त्या गोष्टीचा निकाल लावून घेणार, आपली अनुज्ञा आहेना ?

**दश०**—( लक्ष्मणाला भेटून ) रामाचा वियोग, लक्ष्मणा, मला सहन होत नाहीं; पण लक्ष्मणा, राम एकवचनी आहेरे, तुझा थोरला भाऊ एकवचनी आहेरे—

**राम०**—लक्ष्मणा, मी कौसल्या देवीच्या आणि तुझ्या आईच्या दर्शनाला जात आहें, माझा पाठीराखा म्हणून तूंहि मजबरोबर तेथें आलें पाहिजेस.

**लक्ष्म०**—बाबा, आपणाला होणारा रामाचा विरह टाळण्यासाठीं मी करूं ना युद्ध ?

**दश०**—कौसल्येला विचार, तुझ्या आईला विचार, रामाला विचार आणि मग तुला बरें वाटेल तें कर—दुःख सोसण्यापलीकडे इतर कामासाठीं ह्या दशरथाच्या अंगांत आतां जीव शिल्लक राहिलेला नाहीं.

**राम०**—लक्ष्मणा, चल मजबरोबर कौसल्या मातोश्रीच्या दर्शनाला.

[ लक्ष्मणाला घेऊन जातो.

**मंथ०**—महाराजांनीं मनाला त्रास करून न घेतां दोन घटका कैकेयी देवीची सेवा घ्यावी.—रामनामाचा जप करीत आह्मी दोघीजणी आपल्या शेजारीं उभ्या राहूं पाहिजे तर.

**दश०**—मी एकटाच आतां रामनामाचा जप करतों.

[ पडदा पडतो.

## दुसरा अंक समाप्त.

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—सीतादेवीच्या मंदिरापुढील पटांगण. **दंडकेश्वर** प्रवेश करितो. ]

**दंड०**—हीं वल्कलांचीं गांठोडीं तर लांबवून आणलीं; पण वल्कलें नेसून दंडकारण्यांत जावें किंवा कसें, हा बिकट प्रश्न कांहीं केल्या सुटत नाहीं.—मंथरेला सोडून मी एकटाच कसा जाऊं दंडकारण्यांत?—आणि दंडकारण्यांत गेल्यावर मी पुन्हां आळशी झालों तर?—रामनामानें आळस गेला खरा—पण इतक्या वर्षांचा माझा तो सोबती—आला परत—मी कसें नको ह्मणूं?—तपश्चर्या करावीसें वाटतें—आळस परत आला—राम राम ह्मणतां ह्मणतां जांभया आल्या—आल्याच जांभया—नव्हे बरें दंडकेश्वर, रामनामाची मात्रा तुमच्या आळसावर नेहमींच चालेल असें समजूं नका—रामापेक्षांहि आळस बरा—आळस ह्मणजे परब्रह्म ह्मणतात तें खोटें नव्हे—आपणाला काय करायचीं वल्कलें—द्यावीं टाकून सीतादेवीच्या उंबरठ्यावर—ज्याला पाहिजे असतील तो वल्कलें नेशील.—( वल्कलें फेकतो ) आतां बरें वाटलें—मुद्देमाल फेंकून दिला ह्मणजे चोराला जसें हायसें वाटतें—आतां निष्काळजी मी झालों आहें—मंथरेनें वल्कलांचीं हीं गांठोडीं नीट जपून ठेवलीं होतीं—लांबविलीं शिताफीनें—तपश्चर्येकरितां चोरी करायला कोणती हरकत?—लांबविलीं शिताफीनें—पण चोरासारखा भिऊं लागलों—आतां मी चोर नाहीं—येऊं दे मंथरेला—साफ सांगायला हरकत नाहीं—मी चोर नाहीं—चोरीचा माल सीतादेवीच्या अंगणांत पडला आहे—मी साफ चोर नाहीं—मंथरे, मी चोर नाहीं—

[ दोन दासी येतात.

**प. दा०**—वल्कलें कोठें आहेत? आम्ही एकसारख्या वल्कलांचीं गांठोडीं धुंडाळून पहात आहोंत—कशीं बेपत्ता झालीं!

दु. दा.०—तीं वल्कलांची बोचकीं—तुमच्याशिवाय कोण हात लाव-णार?—दंडकारण्यांत तपश्चर्येला बसण्याचा बेत आम्हीं, मंथराबाईंना सांगितल्यावर—

प. दा०—आपणच वल्कलें पळविलीं असलीं पाहिजेत, असें त्या ह्मणाल्या—चोराला पकडा, अशी त्यांची आज्ञा झाली—

दु. दा.०—चोराला गांठलें आहे—चोरीचा माल दाखवा ह्मणजे सोडून देऊं.

दंड०—मी चोर नाहीं—चोरीचा माल मला माहीत नाहीं—मी आळशी—जांभया द्यायचें सोडून मी कशाला चोरी करूं?—आयतें खायच्या नादानें आळसी चोरी करतो, नाहीं असें नाहीं—पण वल्कलांची चोरी करीत नाहीं.—विजयादेवीचें आणि मंथरेचें मल्लयुद्ध होणार, अशी बातमी ह्या आळशाला कळली आणि त्या कुस्तीच्या तयारीकरितां दोघींनाहीं वल्कलें लागतील म्हणून बोचकीं हातांत घेऊन निघालों—वल्कलें हातांत घेतांच मला दंडका-रण्यांत जावेसें वाटलें—पण रामनाम घेतांच तें तपश्चर्येचें पिशाच्च माझ्या अंगांतून पळालें—जांभया आल्या—बोचकीं तिथें टाकून दिलीं—आणि सीता-देवीचें नांव घेत उभा राहिलों—रामापेक्षांहि सीतादेवीचें नांव अधिक पवित्र आहे—खोटें बोलूं नयेसेंच वाटतें—तीं बोचकीं तिथें आहेत (दासी बोचकीं उचलूं लागतात)—खबरदार बोचक्यांना हात लावाल तर—

प. दा०—कां बरें? मंथराबाईच्या मालकीचीं हीं वल्कलें आहेत, आणि त्यांना आतां त्याची फार जरूरी आहे—

दु. दा.०—असतील तेथून वल्कलें आणा ह्मणून आह्मांला मंथरा-बाईची आज्ञा आहे.

दंड०—पण दुसऱ्याच्या घरांतल्या मालाला हात लावणें चोरी होते.—मी आळशी देखील दुसऱ्याच्या घरांत पडलेल्या जिनसांना हात लावत नाहीं—सीतादेवीनें सांगितलें तर ह्या वल्कलांना मी हात लावणार आहे—नाहींतर

नाहीं–तुह्मी हात लावाल तर चोर चोरी करीत आहेत असें मोठ्यानें ओरडून सीतादेवीकडून तुमच्या मुस्क्या बांधवीन–सीताराम, रामसीता, असा जप केल्यानें अंगांत तरतरी आली आहे—

प. दा०—तरतरी आणि आळशाच्या अंगांत—

दु. दा०—जप केल्यानें बावळट शूर होत नसतो—

[दासी बोचकीं उचलूं लागतात.

दंड०—मी शूर झालों आहें बरें–खबरदार हात लावाल तर–कशा भ्याल्या–पतितपावन सीताराम, सीताराम–मी शूर झालों आहें बरें–कशा भ्याल्या—

प. दा०—आह्मी भिणार ? मंथरादेवीच्या नांवाचा जप करणाऱ्या आह्मी आहों—

दंड०—मंथरेच्या नांवाचा जप केल्यानें मी आळशी झालों–तुह्मीहि पाहिजे तें पातक पाहिजे तेथें करूं शकाल–पण पतितपावन सीतारामाचा जप मी करतों आहें–मी तुह्मांला चोरी करूं देणार नाहीं—

दु. दा०—घेऊं या ग मंथरादेवींचें नांव आणि उचलूं या हीं बोचकीं–मंथरादेवीचा जयजयकार असो— [ बोचकीं घेऊं लागतात.

दंड०—चोरी होत आहे चोरी–सीतादेवीच्या अंगणांत चोरी होत आहे–धांवा कोणी तरी आणि ह्या चोरट्या दासींच्या मुस्क्या बांधा–धांवा, धांवा, मी एकटा आळशी काय करणार–धांवा, धांवा, ह्या चोरट्या दासींच्या मुस्क्या बांधा. [ सीता आणि विजया येतात.

सीता०—कसला गलबला आहे ? विजयाबाई, सासूबाईकडे तुह्मी मला नेत आहां–पण हें कोणतें विघ्न दारांत उभें !

विज०—असा अपशकुन मंथरेचें लटांबर आह्मांला करीत असतें !–मंथरेच्या ह्या खुळचट पिशाच्चांनीं आह्मांला घेरलेलें दिसतें !–देवी, देव लक्ष्मणानें मला सांगितलें देवीला लवकर कौसल्यादेवीच्या मंदिरांत घेऊन ये म्हणून–देव रामचंद्र आतां मातोश्रीच्या दर्शनाला येणार आहेत

आणि राज्याभिषेकाला मोठें विघ्न उत्पन्न झालें आहे, तेव्हां आपण विचार घेऊन कौसल्यादेवी व देव लक्ष्मण तें विघ्न नाहींसें करणार आहेत.–त्या विघ्नाचा विचार करण्याकरितां आम्हीं निघालों तों मंथरेचीं माणसें आमच्या पाळतीवर !

दंड०—मी हेरबीर कोणी नव्हे बरें ! देवी, मी मंथरेचा नवरा, महाराजांना मीच हांसवितो, कैकयीदेवीला मीच हांसवितों, अभिषेकाला विघ्न आलेलें ऐकून देवीला हांसवावें म्हणून येथें आलों आणि रामनामाचा जप करूं लागलों तों ऐती चोरी सांपडली–ह्या बोचक्यांची चोरी काल संध्याकाळीं झाली—

सीता०—पाहूं दे कसलीं बोचकीं आहेत–( वल्कलें घेते ) हीं वल्कलें–कालपासून मी हुडकत आहे कोठें पडलीं म्हणून–काल संध्याकाळीं हीं वल्कलें नाहींशीं झालीं आणि माझ्या मनाला हुरहूर लागली–सुमंत्रमंत्र्याकडून मुद्दाम हीं वल्कलें आणविलीं होतीं—

विज०—मीं वल्कलें पाहिलीं आणि मला वाटलें देवीच्या मंदिरांत हीं वल्कलें असणें चांगलें नाहीं म्हणून मीं हीं वल्कलें मंथरेकडे नजराणा म्हणून पाठविलीं—

दंड०—खऱ्या चोराचा आतां पत्ता लागला–देवी, रामनामाचा असा प्रभाव आहे–चोरीचा माल आपोआप येऊन पडला पहा देवीच्या अंगणांत!–आतां मला प्रथम सांगा अभिषेकाला विघ्न कोणी आणि कसें उत्पन्न केलें आहे ?–संकटाचा तलास करण्यांत मी फार हुषार आहें–संकटें आलीं म्हणजे तलास करावा, आपणच चोर आहों काय–आपली बायको चोर आहे काय–आपलीं मुलें बाळें चोर आहेत काय–घरांत कोणीहि चोर नसला ह्मणजे बाहेरचा चोर घरांत शिरूं शकत नाहीं–घरात संकट नसलें म्हणजे बाहेरचें संकट बाहेरच राहतें–देव रामचंद्राचें संकट सीतादेवीला कां सीतादेवीचें संकट देव रामचंद्राला येऊन पडलें आहे ?–घरांतल्या घरांत तलास करावा—

सीता०—आम्हां दोघांत कोणी कोणाला संकट वाटत नाहीं—

दंड०—मग वल्कलांची हौस कां ?

सीता०—सहज वल्कलें मागविलीं होतीं झालें—तिकडून म्हणायचें झालें विश्वामित्राच्या आश्रमाप्रमाणें वल्कलें नेसून कांहीं दिवस घालवावेत म्हणून. मी ह्मटलें तिकडच्या ऐवजीं मींच पाहिजे तर कांहीं दिवस वल्कलें नेसतें. तुम्हा शोभायचीं नाहींत, महाराज रागावतील, सासूबाई रागावतील, असा हट्ट तिकडून धरायचा झाला; मी साफ सांगितलें, आपण जर वल्कलें नेसाल तर सर्व लोक रागावतील, सजीव निर्जीव सर्व विश्व रागावेल. असा पहा विजयादेवी, आम्हां दोघांमध्यें मोठा बेबनाव झाला. शेवटीं मी सुमंत्र मंत्र्यांना दोन वल्कलें आणा म्हणून सांगितलें आणि दोघांनीं वल्कलें नेसल्यावर काय काय चमत्कार होतो तें पाहूं या, अशी तडजोड काढली.—काल सकाळीं वल्कलें सुमंत्रमंत्र्यांनीं दाखविलीं त्या वेळेपासून जीं नाहींशीं झालीं तीं आतां दृष्टीस पडलीं.—सासूबाईकडे हीं वल्कलें घेऊन जाऊं या, तेथें समजेल हा शकुन अशुभ आहे का शुभ आहे—विजयादेवी, घ्या तीं वल्कलें बरोबर. [ विजया वल्कलें घेऊं लागते. मन्थरा येते.

मंथ०—विजये, तीं वल्कलें माझ्या मालकीचीं आहेत—खबरदार उचलशील तर—( वल्कलें घेऊन ) माझ्या मालकीणीला कैकेयीदेवीला हीं वल्कलें पाहिजे आहेत—मला नजराणा ह्मणून हीं वल्कलें पाठविलींस नव्हे ? माझ्या पाठीवर ओढलेला वळ आतां तुझ्या पाठीवर उमटेल—करावें तसें भरावें—

सीता०—पण मंथरे, वल्कलें मला आवडतात ह्मणून सुमंत्रमंत्र्यांकडून मीं हीं आणवलेलीं आहेत—मला हीं आवडतात—

मंथ०—आवडतात—आवडतात तर कैकेयीदेवीपाशीं मागून घ्या—आतां पुष्य नक्षत्रावर राम वनवासाला निघाला ह्मणजे ह्यांतल्या एका वल्कलाचा नजराणा कैकेयीदेवी रामाला करणार आहे—जोडप्यानें वनवासाला जा ह्मणजे दुसरें वल्कल तुह्माला मिळेल—वनवासाला जा जोडप्यानें—

सीता०—वनवासाला ! अगबाई, वनवासाला काय ह्मणून ?

**मन्थ०**—कैकेयीदेवींनें वर मागून घेतले आहेत, आणि पुष्य नक्षत्रावर वनवासाला जातों म्हणून एकवचनी रामानें वचन दिलें आहे !

**सीता०**—त्यांनीं वचन दिलें आहे !-मग कैकेयी सासूबाईंना सांगा, आशीर्वाद म्हणून तिकडून एक वल्कल घेण्यांत आल्यावर ह्या सुनेला आशीर्वाद देतांना दुसरें वल्कल देण्याची कृपा करावी.

**दंड०**—मंथरे, हीं वल्कलें तूंच ठेवून घे; देव रामचंद्राला आणि सीतादेवीला अरण्यांत ऋषि पाहिजे तितकीं वल्कलें देतील; पण दंडकारण्यांत पुढें पिटाळून लावल्यावर कोणीहि वल्कलें तुला देणार नाहींत आणि शुष्क होऊन पडलेले लतावृक्षहि आपल्या कंदमुळाला तुला शिवूं देणार नाहींत—

**विज०**—अरण्यांत ही उपाशी मरेल आणि कुत्रा देखील हिच्या हडकांना शिवणार नाहीं—

**मंथ०**—अरण्यांत मी जाईन तर ना-अयोध्येचें राज्य आतां माझ्या हातांत आहे-आतां भरतराज्य सुरू झालें आहे बरें, भरतराज्य सुरूं झालें आहे— [ लक्ष्मण येतो.

**लक्ष्म०**—भरतराज्य कसचें सुरू होणार ! अयोध्येचें सिंहासन वडील मुलालाच मिळालें पाहिजे, असा रघुकुलाचा नियम आहे आणि रघुकुलांत उत्पन्न झालेल्या प्रत्येक पुरुषाला हा नियम अमलांत आणण्याचा हक्क आहे. माझा जन्म रघुकुलांत झाला आहे आणि रघुकुलाच्या कीर्तीला मी कोणा-लाहि-बाबांना, कैकेयीला, किंवा देव रामचंद्राला-कोणालाहि मी रघुकुलाच्या कीर्तीला डाग लावूं देणार नाहीं.-वहिनी, कौसल्यामातोश्रीच्या मंदिरांत देव रामचंद्र आतां जाणार आहेत तेथें आईची आज्ञा मी घेतों आणि दादांना कौसल्यामातोश्रीच्या देखत राज्याभिषेक करून महाराज रामचंद्राच्या नांवाची द्वाही मी फिरवितों-राज्याभिषेकाची सामुग्री वाया जाणार नाहीं.

**मंथ०**—आतां कोठली राज्याभिषेकाची सामुग्री !-वनवासाची सामुग्री आतां-हीं पहा वल्कलें-एक रामाला, एक सीतेला-आणि लक्ष्मणा तिसरें पाहिजे असेल तर तेंहि तयार आहे-ही मंथरा कल्पवृक्ष आहे बरें कल्पवृक्ष-पाहिजे तितकीं वल्कलें पुरवितें—

**दंड०**—हा वल्कलांचा कल्पवृक्ष जाऊं द्या आतां दंडकारण्यांत, म्हणजे बिचाऱ्या गरीब ऋषींना वल्कलांची तरी ददात राहणार नाहीं.

**लक्ष्म०**—हिला दंडकारण्यांत कोण जाऊं देतो ? रघुकुलाचा अधःपात व्हावा म्हणून महाराज रामचंद्रांना शिव्याशाप देणाऱ्या राक्षसीला जिवंत कोण ठेवणार ?

**विज०**—ह्या मंथरेचें पाप लोकांना समजलें म्हणजे लोक हिला जिवंत जाळतील-अग्निशिवाय हिच्या पापाचें भस्म होणार नाहीं.

**मंथ०**—मी कोणतें पाप केलें आहे ? महाराजांनीं वर दिले, कैकेयी देवीनें मागून घेतले, रामानें वचन दिलें, ह्यांत पाप कोणतें ? परमेश्वराला डोळे आहेत—

**दंड०**—आणि मलाहि डोळे आहेत-तूं आगलावी, भांडखोर, आहेस-आळशी नवऱ्याला जांभयाहि येऊं नयेत, त्यानें मंत्री व्हावें-काय मिळविलेंस माझी झोंप मोडून ?

**मंथ०**—ह्या जन्मीं तरी मी कांहीं पाप केलें नाहीं-ही पापाची धाण माझ्या डोक्यावर नवरा म्हणून बसली आहे; पूर्वजन्मींचें कांहीं पाप असेल कदाचित्-

**विज०**—डोक्यावरील या धाणीसकट जळून जा म्हणजे तूंहि पवित्र होशील आणि तुझा नवराहि पवित्र होईल-

**दंड०**—मंथरेला जर तुम्ही जाळलीत तर मी सती जायला तयार आहें-आळश्यांना कसलेंहि मरण चालतें-मरतां मरतां आळस द्यावा आणि चुटकी वाजवतां वाजवतां प्राण सोडावा—

**मंथ०**—तुम्ही मरायला तयार असला तर खुशाल मरा-माझ्या मागाहून मरा, अगोदर मरा, सतीचें वाण घेण्याइतकी मी भोळी नाहीं.-राजसत्ता हातीं घेऊन मिरवत मिरवत देह झिजेल आणि मग मरण येईल तेव्हां येईल-रघुकुलाची राजसत्ता माझ्या हातांत—

**लक्ष्म०**—रघुकुलाची राजसत्ता तुझ्या हातांत गेलेली पहावयाला रघुकुलांतला एकहि पुरुष जिवंत राहणार नाहीं—

**मंथ०**—देव भरत तें पाहील आणि माझें रक्षण करील-

लक्ष्म०—भरत तें पाहील–भरत तुझें रक्षण करील–कालत्रयीं होणार नाहीं–रघुकुलाचें रक्त भरताच्या अंगांत आहे—

मंथ०—पण भरताला राज्य माझ्यामुळें मिळत आहे–कैकेयी एक वेळ दशरथमहाराजांशिवाय जिवंत राहील पण माझ्याशिवाय जिवंतच राहाणार नाहीं आणि कैकेयीपुढें भरताचें कांहीं चालणार नाहीं.

लक्ष्म०—भरत आमचा भाऊ आहे, दशरथाचा मुलगा आहे–रघुकुलांत जन्मला आहे–रघुकुलाची न्यायनीति वसिष्ठगुरुंनी त्याला शिकविली आहे–एकवचनी राम सत्यनिष्ठेकरितां जर अरण्यांत गेला तर भरतहि सिंहासनावर बसणार नाहीं आणि रामाप्रमाणें तपस्वी होऊन अयोध्येबाहेर राहील. रामाच्या शरिरांत जें रक्त खेळत आहे तेंच रक्त भरताच्या शरिरांत खेळत आहे–रामाच्या शरिरांत, भरताच्या शरिरांत आणि लक्ष्मणाच्या शरिरांत एकच रक्त—

मंथ०—आलें आहे एकच रक्त! कौसल्येचें रक्त निराळें, कैकेयीचें रक्त निराळें आणि सुमित्रेचें रक्त निराळें.–रामाचें रक्त, लक्ष्मणा, असें बायकांवर तोंड टाकण्याइतकें उसळतें का?–सितादेवी, लक्ष्मणाचें रक्त अगदीं निराळें आहे बरें अगदीं निराळें आहे–केव्हां दगा देईल नेम नाहीं.–संभाळून असा–सत्यप्रतिज्ञ राम दंडकारण्यांत जाणारच जाणार—

लक्ष्म०—मी जाऊं देणार नाहीं–रघूंच्या कुळाबाहेर रामाला तसें वागतां येत नाहीं–रघुकुलाचा नियम—

मंथ०—रघुकुलाचा कसला नियम! आप्पलपोटेपणा हाणा–राम वनवासाला जावा, रघुकुलाचें ढोंग करून भरताला मारून टाकावें आणि स्वतः सिंहासनावर बसावें, लक्ष्मणाचा हा डाव आहे बरें डाव–सीतादेवी, भरताच्या ऐवजीं जर लक्ष्मण सिंहासनावर बसला–मी जिवन्त जाळली जाईन–सीतादेवी, आपली अब्रूहि जाळायला ह्या लोभ्याचे हात चुकणार नाहींत.–राजसत्ता आणि सौंदर्य ह्यांची हांव सुटली आहे लक्ष्मणाला–सीतादेवी, तुम्ही आपल्या रामाबरोबर वनवासाला जा–भरतराज्याऐवजीं जर लक्ष्मणराज्य झालें, नाहीं हो तुमच्या अब्रूची धडगत मला दिसत नाहीं!

**सीता०**—मंथराबाई, माझ्या अब्रूची काळजी आपण कशाला करतां ? आमचें वनवासांत काय होईल म्हणून त्रास तुमच्या जिवाला कशाला ? भाऊजी, मंथरेच्या बोलण्याकडे लक्ष देऊन उगीच संताप करून घेऊं नका—सासूबाईंच्या दर्शनाला जाऊं या—तेथें जसें ठरेल तसें तुम्ही वागा.—माझा विचार कोणीच करूं नका—मी तिकडची सावली आहे, त्यांचा आणि माझा वियोग होऊंच शकत नाहीं.—जेथें ते तेथें मी.—मुळावर घांव घालतां येतो पण सांवलीवर घांव घालतां येत नाहीं—सम्पूर्ण अन्धकाराला मात्र सावली नष्ट केल्यासारखें वाटतें, पण तसला अन्धकार हृदयांतील दिव्य ज्योति पेटविण्यास कारणीभूत होतो आणि मग सीतेची छाया पुन्हां दिसूं लागते.—भाऊजी, कैकेयी सासूबाई किंवा मंथरा म्हणजे खग्रास ग्रहण नव्हे—ह्यांच्यामुळें सूर्यासभोंवतींची प्रभा मात्र अधिक स्पष्ट दिसणारी आहे—मंथरेला कांहीं उत्तर देऊं नका आणि चला माझ्या मागोमाग सासूबाईंच्या दर्शनाला.

[ जाऊं लागते.

**लक्ष्म०**—मंथरे, तुझ्या चेष्टांचें आयुष्य अगदीं थोडें उरलें आहे म्हणून समज.

**विज०**—मंथरे, जितकें विष ओकायचें असेल तितकें आतां ओक—अखेरीला ओकलेलें विष स्वतःच्याच जिभेनें चाटून चाटून खावें लागेल.

[ सीता, लक्ष्मण, विजया जातात.

**मंथ०**—भोळी बिचारी सीता—आपखुषीनें जाते म्हणते नवऱ्याच्या मागून दंडकारण्यांत.—कैकयी अशीच निपजते कीं काय म्हणून मला भीति वाटत होती—आतां चांगली समजूतदार झाली आहे. दशरथानें प्राण सोडला तरी हातांत आलेलें सिंहासन कैकेयी सोडणार नाहीं.—बायका समजूतदार असाव्या लागतात, मग पुरुष कसलेहि वेडेविद्रे, साधेभोळे, खुळे, अजागळ असले तरी बिघडत नाहीं.

**दंड०**—समजूतदार बायका पुरुषांचीं वल्कलेंहि हिरावून घेतात.—अग तुझ्या मुठींत आतां अयोध्येचें सिंहासन आलें; मग माझ्या त्या वल्कलांच्या बोचक्यांची चोरी कशाला ? समजूत म्हणजे चोरी करण्याची विद्या—सीतादेवीला ती विद्या नको आणि तुझ्या आळश्यालाहि ती विद्या नको—समजूतदार बायकोच्या नादानें चोर होण्यापेक्षां आळशी होणें काय वाईट ?

**मंथ०**—कोणाला चोर म्हणतां, तोंड आटपून बोला-इथेंच तुम्हांला तुरुंगांत दंडकारण्य दाखवीन, समजलांत ? भलत्यामलत्या वेळीं नवऱ्याची पर्वा करणारी ही मंथरा नव्हे.

**प. दा०**—आळसांत सुखानें रहायचें सोडून तुरुंगवास कशाला ?

**दु. दा०**—लोळायला फुलांचे ढीग तुरुंगांत नमतात हो.

**दंड०**—मी आतां रामाच्या बाजूचा झालों आहे-फुलांचे ढीग आणि मिरवणूक मंथरेकरितां आहेत; रामनाम, सीतारामाचें भजनकीर्तन माझ्या-करितां आहे.-आळस आला-पण हा असा गेला-लक्ष्मण पुरवला पण हा दंडकेश्वर नको, असें करून मोडतों.-आळसेश्वराचा अवतार संपला, आतां मी दंडकेश्वर आहे आणि राम माझ्या राज्यांत चौदा वर्षें-दहा आणि चार-किती होतात-दहा, अकरा, बारा, तेरा, चौदा वर्षें—

**मंथ०**—आहारे दंडकेश्वराचा प्रताप !

**प. दा०**—दहा आणि चार चौदा होतात, हें बोटें घातल्याशिवाय ह्यांना समजत नाहीं !

**दु. दा०**—दासींना देखील दहा आणि चार चौदा होतात, हें चट-दिशीं सांगतां येतें-तेवढें देखील ह्या दंडकेश्वराला समजत नाहीं !

**दंड०**—कशाला समजायला पाहिजे ? माझ्या आळसानें हें मला शिक-वलें नसलें तरी मंथरेला मिरवायला पाहिजे ह्मणून मला मंत्री मंथरा करणार होती, हें चांगलें शिकविलें आहे.-मंथरेला मिरवायला पाहिजे ह्मणून कैकेयीला नटवेपणांत मंथरेनें तरबेज केली, मंथरेला मिरवायला पाहिजे म्हणून त्या चाव्याची बाधा सत्यप्रतिज्ञ रामाला झाली, मंथरेला मिरवायला पाहिजे म्हणून लक्ष्मणाला राजतृष्णा आहे असें ही बरळली, मंथरेला मिरवायला पाहिजे म्हणून सीतेच्या अंतःकरणावर हिनें विषारी फूत्कार ओतले, मंथरेला मिरवायला पाहिजे म्हणून तिचीं सर्व बिंगें माहीत असलेल्या ह्या साध्या भोळ्या नवऱ्याला तिलांजलि द्यायला मंथरा तयार झाली; मला ह्या सर्व गोष्टी समजतात-हे सर्व समजणाऱ्या ह्या दंडकेश्वराच्या राज्यात राम चौदा वर्षें राहणार आहे; तेव्हां तुझीं सर्व बिंगें वेशीवर टांगून रामाच्या कीर्तीला लागत असलेला डाग धुवून काढणें दंडकारण्याच्या ह्या राजाला भाग आहे.-तूं माझी पर्वा करीत नाहींस मीहि तुझी पर्वा करीत नाहीं.



दंड० —नवऱ्याला लाथा मारतेस— [ पृ. ८९

**मंथ०**—खुशाल आतां अयोध्येच्या रस्त्यांतून पाहिजे तें बरळत फिरा; उद्यां भरतराज्य झाल्यावर लोकच तुह्माला धोंडे मारून ठार करतील.—चलाग दासींनों, ही वल्कलांचीं बोचकीं घेऊन कैकेयीदेवीच्या मंदिरांत ठेवा, मी कौसल्येच्या मंदिराचा कानोसा घेऊन येतेच तुमच्या मागोमाग—

**दंड०**—चालला कोठें वल्कलें चोरून—जखमेवर मिटाचें पाणी शिंपडण्याचा तुझा दुष्टपणा मी साधूं देणार ? आयत्या वेळीं रामाला वल्कलें देऊन रामाचा अपमान करणार—घेतों वल्कलें अशीं जबरदस्तीनें आणि टाकतों त्याच्या चिंधड्या करून— [ बोचकीं हिसकावून घेऊं लागतो.

**मंथ०**—माझ्या मालकीचीं आहेत हीं वल्कलें—कशीं देत नाहीं—पाहू दे—

[ बोचकीं ओढून घेऊं लागते.

**दंड०**—सीतादेवीच्या मालकीचीं आहेत हीं वल्कलें—तुझ्या हाताचा विटाळ होऊं द्यायचा नाहीं त्यांना. धांवा, धांवा, ही मंथरा सीतादेवीच्या वल्कलांची चोरी करीत आहे—नवऱ्यावर हात उगारतेस—नवऱ्याला लाथा मारतेस—ह्या आळश्याच्या जिभेंत जोर आहे—धांवा, धांवा, धांवा कोणी तरी आणि पटाईत चोर बनलेल्या ह्या राक्षसणीच्या तावडींतून तिच्या नवऱ्याला सोडवा—राजाराम, सीताराम धांवरे धांव सीताराम आणि सीतादेवीची चोरी—सीतादेवीची चोरी— [ राम व सुमंत्र येतात.

**राम०**—सीतादेवीची चोरी ! देवी आहे ना आपल्या मंदिरांत ? हें काय भांडण चाललें आहे ?

**सुमं०**—मी आपलीच वाट पहात आंत उभा होतों. सीतादेवी व देव लक्ष्मण कौसल्या देवीच्या मंदिराकडे गेले आहेत आणि आपल्याला वर्दी देऊन—

**राम०**—मग चला सुमंत्रमंत्री, मातोश्रींच्याच दर्शनाला आतां आपण जाऊं—सीतादेवीची चोरी म्हणून ह्यांनीं ओरड कसली केली ?

**मंथ०**—आपणांबरोबर दंडकारण्यांत जाण्याची तयारी सीतादेवीनें केली आहे; दंडकारण्यांतले राक्षस सीतादेवीची चोरी करतील अशी मला भीति वाटली आणि तसें सुचवावें म्हणून येथपर्यंत आलें तों आमच्या ह्या खुळ्यानें 'सीतादेवीची चोरी' 'सीतादेवीची चोरी' असेंच वेड पांघरलें !—उगीच भलतेंसलतें बरळूं नका, दांतखिळी बसल्यासारखे गप्प रहा.

दंड०—हीं सीतादेवीचीं वल्कलें आहेत—मंथरा चोरीत होती—

मंथ०—दोघांनीं मिळून अरण्यांत जायचें ठरलें तर दोन वल्कलांचा उपयोग—पण सीतादेवीची चोरी होण्याचा संभव असल्यामुळें देवीला नव्हे नेऊं अरण्यांत—

राम०—तिची येण्याची तयारी असल्यावर मी कोण नको ह्मणणार? सुमंत्र, देवीच्या कानावर वनवासाची हकीकत घालणार होतों, पण दुर्दैवाची बातमी माझ्याहि पुढें येथें धांवून आली!—देवीपुढें कोणते शब्द उच्चारावेत, मनाला काळजी वाटत होती—वनवासांत देवीची चोरी होणार ह्या शब्दांनीं मात्र माझें मन वेधून सोडलें आहे—राक्षसांनीं तसली चोरी केली तर राक्षसांच्या कुळांचा संहार झालाच म्हणून समजावें.—सुमंत्रमंत्री, देवीनें हट्ट घरला तरी देवीला वनवासांत बरोबर नेऊं नये असें माझ्या मनांत कैकेयी मातोश्रीचें मंदिर सोडतांना आलें—पण सीतादेवीची चोरी हे शब्द कानीं पडतांच—होऊं द्या तसली चोरी—रामाच्या धनुष्याचा उपयोग दंडकारण्यांत होणार आणि राक्षसांच्या कुळांचा संहार होणार असें आतां माझ्या बुद्धीनें पक्कें घेतलें आहे.—मंथरे, सीतादेवीची चोरी, हे शब्द मला ऐकवून तूं मला ह्यावेळीं शुभशकुनच केला आहेस—दंडकारण्यांत जाण्याची हौस मला वाटूं लागली आहे—देवीपुढें कसें बोलूं काय बोलूं ह्याची काळजी उरलेली नाहीं—मंथरे, अरण्यांत जातां जातां माझ्या हातून तुझें कांहीं हित होण्यासारखें असेल तर तें मला सांग—

मंथ०—हीं वल्कलें आपल्याकरितां ठेवलीं आहेत; कैकेयीदेवीनें वनवासाला निघालेल्या रामसीतेला हीं वल्कलें अर्पण केलीं म्हणजे नाकें मुरडलीं जाऊं नयेत, एवढीच विनंति आहे.

राम०—आईचा प्रसाद आम्हीं दोघेंहि आनंदानें ग्रहण करूं व धन्य होऊं असें कैकेयीमातोश्रीला सांग.—चला सुमंत्र आईच्या दर्शनाला.

[ राम व सुमंत्र जातात.

मंथ०—'सीतादेवीची चोरी, सीतादेवीची चोरी' असें खुळ्यासारखें बरळून रामाच्या एकबाणी धनुष्यापुढें मरायची पाळी आली होती—चतुर बायको असली म्हणजे असे प्राण वांचतात हो—जाग दासीनो बोचकीं

घेऊन कैकेयीदेवीच्या मंदिराकडे. ( दासी जातात ) राम वनवासाला निघून जाईतों अशीच दांतखिळी बसली पाहिजे, ताकीद देऊन ठेवतें. [ जाते.

दंड०—रामाला सर्व कांहीं भडभड सांगावें म्हणून मनांत आणलें–दांतखिळीच बसली!–रामाकडे जे डोळे लागले, जिभेचा व्यापार खुंटला आणि ह्या राक्षसीचें साधलें.–आतां डोळे मिटून धरतों कानावर हात ठेवतों–आणि राजा रामाची चोरी–मंथरेची हरामखोरी–सीतारामाची चोरी–मंथरेची हरामखोरी–असें अयोध्येभर ओरडत फिरतों. [ जातो.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ—कौसल्येचें मंदिर. श्रीविष्णूची पूजाअर्चा चालली आहे; होमहवन होत आहे; पुरोहित, पुजारी, कौसल्या, लक्ष्मण, सीता उभीं आहेत, असा देखावा. ]

कौस०—लक्ष्मणा, अभिषेकाची रामाची मिरवणूक निघाली ना? नारायणाचा व अग्नीचा प्रसाद घ्यायला माझा राम आतां इतक्यांत येईल ना?

लक्ष्म०—आई, दादा इतक्यांत येथें येईल. पण–पण—

कौस०—पण–पण–काय? मिरवणूक निघाली ना?

सीता०—मिरवत यायचें होणार नाहीं, एकटेंच यायचें होईल.

कौस०—ह्मणजे? मिरवणुकीला अडथळा झाला कीं काय?–सीते अशी रडतीस कां?–लक्ष्मणा, तूं कां गप्प? मिरवणुकीला अडथळा झाला काय?–मी आतांच होम संपविला आहे; सर्व विघ्नें शांत होतील; मिरवकीला अडथळा—

सीता०—मिरवणुकीलाच नाहीं, राज्याभिषेकालाहि—

कौस०—ह्मणजे? काय झालें सांगरे लक्ष्मणा, लवकर—

लक्ष्म०—दादांनीं चौदा वर्षें वनवासाला जायची प्रतिज्ञा केली आहे; कैकेयीनें बाबांच्यापाशीं वर मागून घेतला आणि दादांनीं दिला–आई, आजपासून भरतराज्य सुरू होऊन तुझा राम वनवासाला—

कौस०—देव आणि धर्म–हा नारायण साक्षी आहे, पूजेअर्चेंत मी

कांहीं कमी केलें असेल तर—हा अग्नि साक्षी आहे, या होमांत कांहीं कमी केलें असेल तर—पुरोहित, हे ब्राह्मण साक्षी आहेत, माझ्या भक्तिभावांत कांहीं कमी असेल तर—मग मला असें फळ कां ?—देवाला दोष द्यावासें वाटतें, अग्नीला विसरावेसें वाटतें, गुरुपुरोहितांना बोलावेसें वाटतें—माझेंच नशीब खोटें, उगीच दुसऱ्याला बोल लावून काय उपयोग ?—लक्ष्मणा, राम वनवासाला खरेंच जाणार काय ?

**सीता०**—आणि मीहि त्यांच्याबरोबर वनवासाला जायचें ठरविलें आहे—

**कौस०**—सीते, असें निष्ठुरपणानें तुला बोलवते तरी कसें !—देवा, आतां इतक्यांत दासीनें जो वृत्तांत सांगितला, तो खरा एकूण !—रामसीता वनवासाला जाणार हें ऐकल्यावर जगून काय करायचें आहे—नको मला हें जगणें—नको मला हा देवधर्म—मरण काय वाईट— [ मूर्च्छा येऊन पडते.

**लक्ष्म०**—आई, आई, हें काय ? तूंच असा धीर सोडल्यावर लक्ष्मणानें काय करावें ? आई, सावध हो आणि लक्ष्मणाला आज्ञा कर, मी दादांना वनवासाला जाऊं देणार नाहीं, पण आई, तुझी मला तशी आज्ञा पाहिजे.

**कौस०**—(सावध होऊन) लक्ष्मणा, काय पाहिजे तें कर आणि राम वनवासाला जाणार नाहीं असें होऊं दे.—दासींनीं सांगितलें पण तें सर्व खोटें वाटलें—लक्ष्मणा, सवतीनें सूड उगाविला, खरें ना ?

**लक्ष्म०**—खरें अगदीं खरें—पण मीं बाबांपासून वचन घेतलें आहे, तुझी आणि धाकट्या आईची आज्ञा घेऊन मधल्या आईविरुद्ध मी पाहिजे तसा वागलों तरी बाबांची हरकत नाहीं. म्हणून ह्मणतों आई भरताच्या अभिषेकाला आणि रामाच्या वनवासाला मोडा घालून दादाला सिंहासनावर बसविण्याची आज्ञा तूं मला कर, तुझ्या आज्ञेप्रमाणें घडवून आणण्याचें सामर्थ्य तुझ्या लक्ष्मणाच्या बाहूंत भरपूर आहे.—एका रामाशिवाय दुसरा कोणताहि वीर ह्या लक्ष्मणाच्या बाणापुढें जिवंत राहणार नाहीं.—कैकेयीच्या चिथावणीनें भरत रणांगणावर माझ्यापुढें उभा राहिलाच तर एका क्षणांत त्याला आपले प्राण सोडावे लागतील.

**सीता०**—पण भावाभावामधलें युद्ध ह्मणजे रघुकुलाला कलंकच नव्हे काय ?

**कौस०**—मुलामुलांना आपापसांत लढतांना पाहण्याकरितांच आईबाप जगत असतात का ?

**लक्ष्म०**—आई, मी भरताचा वध करणार आहें, असें नव्हे; कैकेय देशाबाहेर भरताला मी पडूंच देणार नाहीं, आणि मग रिकाम्या पडणाऱ्या सिंहासनावर रामाला बसावेंच लागेल.—आई, तूं मला आज्ञा कर आणि पहा माझा पराक्रम—कोणाच्याहि शरिराला यत्किंचितहि न दुखवितां मी दादांचा राज्याभिषेक पार पाडतों.

**सीता०**—मामंजींना नाहीं का तसें करतां यायचें ?

**लक्ष्म०**—बाबा वचनांत सांपडले आहेत आणि दादांनीं बाबांचें वचन पाळण्याची प्रतिज्ञा केली आहे; पण मी वचनबद्ध नाहीं, मीं प्रतिज्ञा केलेली नाहीं.—रघुकुलाचा नियम प्रत्येकाला पाळावयास लावण्याला मी स्वतंत्र आहें.—आई, तूं जर मला आज्ञा केलीस तर बाबांची इच्छा असो वा नसो रामाचा आतांचा राज्याभिषेक मी पार पाडण्यास तयार आहें.—मातेच्या आशीर्वादानें सर्व कांहीं पवित्र होत असतें.—आई, तूं सांग तसें मला, दादांचा हात धरून निमूटपणें बसवितों दादांना सिंहासनावर—आई, वडील माणसावरहि केव्हां केव्हां अशी जबरदस्ती करावी लागते.—बाप, गुरु, वडील भाऊ व घराण्याचा प्रमुख आततायी होऊन जर शिस्त मोडूं लागला तर त्याच्यावरहि शस्त्र उगारण्यास हरकत नाहीं, अशी शास्त्राची आज्ञा आहे. शिस्तीच्या संरक्षणाकरितां हा धर्म पाळण्यास श्रेष्ठ पुरुष तत्पर असतात. मग आई, अपरंपार शक्ति ह्या लक्ष्मणाच्या बाहूंत तुझ्या आशीर्वादानें ठेविली असतांना वनवासाला निघालेल्या रामाला शिस्तीचा खरा मार्ग ह्या लक्ष्मणानें कां दाखवूं नये ?—मी रामाची प्रतिज्ञा मोडून काढणार—

[ राम येतो.

**राम०**—रामाच्या प्रतिज्ञेचा भंग करण्याचें सामर्थ्य त्रिलोकांत कोणाच्याहि अंगीं नाहीं.—आई, तुझा हा आवडता मुलगा पित्याचें वचन खरें करण्याकरितां वनवासाला जावयाला निघाला आहे.—मी माझ्या तोंडून हा वृत्तांत मातोश्रींना निवेदन करण्यापूर्वी मातोश्रींच्या कानीं पडून माझ्या

हृदयावरचा भार जसा हलका झाला आहे, तसाच माझ्या वनवासाचा मार्ग आशीर्वाद देऊन सुखद करण्यास मातोश्रींचें पवित्र अन्तःकरण समर्थ आहे. [ पायां पडतो.

**कौस०**—ऊठ रामा ऊठ, रामा तुझें हृदय फुलाहून नाजूक व वज्राहून कठिण आहे, हें मला माहीत आहे; पण तितकी योग्यता माझी नाहीं.—वासराची ताटातूट झाली असतांना गाईची जी अवस्था होते ती अवस्था दुर्दैवानें माझी केली आहे.—रामा, तुला सोडून कोणाकडे पाहून मी दिवस कंठूरे ?—सवतीनें झिडकारलें, तिकडून अपमान करण्यांत आला, देव नवसाला पावला नाहीं, कांहीं झालें तरी तुला पाहिलें ह्मणजे माझें सर्व दुःख नाहींसें होतें.—सवतीनें मला पावलोंपावलीं छळावें, अशा नरकांत मला लोटून देऊन रामा, वनवासांत कोणतें पुण्य तूं संपादन करणार ? जिवंतपणाच्या नरक-यातनांतून आईला ज्या पुत्रानें सोडविलें नाहीं त्या पुत्राला सद्गति मिळते कारे रामा ?

**राम०**—आई, तुझे हाल हा राम कसा करील ? तुझ्या मनाला यातना होणार; पण दुर्दैवापुढें हात टेकणें मला भाग आहे.—सत्याची कांस धरणा-रांना असल्या दुर्दैवाच्या ठेंचा लागावयाच्याच—शांत चित्तानें असलें दुःख सोसल्याशिवाय दुसरा मार्ग कोणता आहे ?

**लक्ष्म०**—दुसरा मार्ग युद्धाचा आहे.—दुर्दैव—दुर्दैव—पराक्रमी पुरुषांनीं जर दैवावर हवाला दिला तर पराक्रम कशाला ? दैव सर्व कांहीं करीतच आहे !—दादा अस्त्रविद्या शिकलां कशाला ? तुमच्या बाहूंत अजिंक्य शक्ति कशाला सांठवून ठेवली आहे ?—आपण खुशाल दैवाकडे बोट दाखवा, मी धनुष्याकडे बोट दाखविणार.—दैव दाखवील त्या मार्गानें जाण्याची जरुरी पराक्रमी पुरुषांना नसते—धनुष्यबाण दाखवितील तो मार्ग धनुर्धरांचा असतो.

**राम०**—लक्ष्मणा, माझ्या बाहूंतील शक्ति ह्मणजे सत्याची शोभा होय.—मनुष्य मेल्यावर त्याच्या शरिरावरचे वस्त्रालंकार जसे टाकाऊ ठरतात त्या प्रमाणेंच सत्य सोडल्यावर शक्ति टाकाऊ ठरते.- सत्य सोडून शक्तीचा नाद धरणें म्हणजे प्रेतावरील कपड्याकरितां टपून बसणें होय.—प्रसंग आला तर अलंकार काढून ठेवावेत पण प्राण देऊन आत्महत्या करूं नये.—आज मी

धनुष्यबाणांना विसावा देत आहे, सत्याची हत्या मला करवत नाहीं.—लक्ष्मणा, पराक्रमाकरितांच तुझ्याप्रमाणें मी अस्त्रविद्या शिकलों, पराक्रमाकरितांच ह्या बाहूंत मीं प्रचंड शक्ति सांठविली, आणि पराक्रमाकरतांच मी धनुर्धरांचा अग्रणी झालों; पण सत्यपालनाला उचलून धरण्याकरितां पराक्रम आहे. लक्ष्मणा, पराक्रम सत्याची गळचेपी करण्याकरितां नाहीं—

**लक्ष्म०**—दादा, हे बाहू—हे हात—बायकांप्रमाणें सौंदर्याचे पल्लव ह्मणून शरिरावर वाहूं काय ? दुःखाच्या डागण्या आईच्या हृदयावर दिल्या जात असतांना, चित्रविचित्र रंगाच्या माळेप्रमाणें हें धनुष्य गळ्यांत बाळगून बायकांप्रमाणें मी मिरवूं काय ? विद्युल्लतेप्रमाणें चमकणारें खड्ग हिऱ्यामोत्यांचा दागिना म्हणून कमरेला लटकावूं काय ? पराक्रमी पुरुषांना शोभेचें खेळणें बनविणारा तुमचा उपदेश, दादा, मला पटत नाहीं.

**राम०**—मी दुर्दैव—दुर्दैव म्हणून ह्मणतों तें हेंच.—माझें सत्यपालन तुला लक्ष्मणा, मूर्खपणाचें वाटतें--ह्या दुर्दैवावर चौदा वर्षांच्या प्रत्यक्ष वनवासाशिवाय दुसरा इलाज नाहीं.—माझें सत्य तुला पटत नाहीं—चौदा वर्षांनंतर पटेल—चौदा वर्षांत सत्याच्या सेवेकरितां मी माझ्या शस्त्रास्त्रांचा कसा उपयोग करितों ह्याचा अनुभव घेतल्यावर लक्ष्मणा, तुझा दादा मूर्ख नाहीं हें आपोआप तुझ्या ध्यानीं येईल.—आई, वनवासाला जावयास निघालेल्या तुझ्या ह्या आवडत्या लेकराला आतां आशीर्वाद दे— [ पायां पडूं लागतो.

**लक्ष्म०**—आई, आशीर्वाद देऊं नकोस—लक्ष्मणाचे बाण दादांना वनवासाला जाऊं देणार नाहींत—दादा, तुमच्या बाहूंतल्या पराक्रमापुढें ह्या लक्ष्मणाची शक्ति कांहीं नाहीं हें मला माहीत आहे; पण तुह्मांला अडथळा करतांना तुमच्याशीं लढणाऱ्या ह्या लक्ष्मणाचें शिर एकबाणी रामानें धडापासून वेगळें करून, आपल्या ह्या सौमित्राचें मस्तक पायाखालीं ठेंचाळून, दंडकारण्याचा मार्ग आपणाला आक्रमावा लागेल—

**राम०**—तसें नाहीं व्हावयाचें.—युद्ध करूनच मला अडथळा करावयाचा असेल—तुझ्या हट्टाला मी कोण आळा घालणार—सौमित्रा, तुझ्या बाणांनीं विव्हल झालेला राम वनाकडे तोंड करून जमिनीवर मरून पडलेला दृष्टीस पडेल.—रामाचा बाण, लक्ष्मणा, तुझ्याशीं लढण्याकरितां भात्यांतून बाहेर पडणार नाहीं; पण वनाकडे वळलेलें रामाचें पाऊल एक रेसहि मागें येणार नाहीं.

सीता०—ह्या असल्याच दृढनिश्चयावरून सर्व प्राण ओवाळून टाकावे असें वाटतें.

लक्ष्म०—(रामाचे पाय धरून) दादा, असें कसें हो माझ्याशीं कठोरपणानें वागूं शकतां—

राम०—( लक्ष्मणाला उठवून ) लक्ष्मणा, मी तुझ्याशीं कठोर कसा होईन ?–सौमित्रा, मी कठोर नाहीं–संसाराच्या रोजच्या रसांत गुरफटलेल्यांना सत्य कठोर दिसतें.

लक्ष्म०—दादा, तुह्मी मला तुमचा राज्याभिषेक पार पाडूं देत नाहीं मग मी अयोध्येंत राहून काय करूं ? तुमचा जो मार्ग तोच मार्ग ह्या हतभागी लक्ष्मणाला स्वीकारणें भाग आहे. तुमचें सत्य मला समजत नाहीं; तें समजावें, गुरूपासून ते शिकावें, गुरूची सेवा करून हृदयांत तें सत्य बिंबवावें, म्हणून ह्या निराश व निरुत्साह झालेल्या लक्ष्मणाला दंडकारण्यांत आपल्याबरोबर घेऊन चला.–आई, दादांच्याबरोबर त्यांचा सेवक व शिष्य म्हणून मीहि दंडकारण्यांत जाणार—

राम०—लक्ष्मणा, असा कसा उतावीळ होतोंस ? मातोश्री सुमित्रेची आज्ञा नको का घ्यायला ?

लक्ष्म०—ती आज्ञा मीं घेतली आहे.–युद्ध करण्याचा माझा बेत जेव्हां धाकट्या आईला कळविला तेव्हां तो तिला तितकासा आवडला नाहीं आणि दादांची संमति असल्यास तसें कर नाहींतर तूंहि रामाची सेवा करायला दंडकारण्यांत जा आणि आपल्या मातेचें घराणें पवित्र कर, असें तिनें मला बजावलें.–दादा येऊंना मी आपल्याबरोबर दंडकारण्यांत ? द्याल ना मला सत्याची दीक्षा ? घ्यालना माझी सेवा ? शिकवाल ना ह्या चुकलेल्या शिष्याला ?

राम०—सौमित्रा, जन्मल्यापासून मोक्षापर्यंत माझ्या जिवाला चिकटून राहणारा तूं माझा मित्र आहेस–मित्राची सोबत रानावनांत मला नकोशी कशी होईल ?–लक्ष्मणा, तूं माझा सोबती; तुझे बाण, तुझें कवच, तुझें खड्ग, सर्व शस्त्रास्त्रें बरोबर घे; एकवचनी रामाकरितां लढण्याचा प्रसंग दंडकारण्यांत आल्यावर सत्याला सोडून तुझी वीरवृत्ति जाणार नाहीं आणि क्षात्रतेजाचें सर्व मंगलदायक यश तुझ्या पदरांत पडेल, अशी खबरदारी तुझा हा वनवासी मित्र खात्रीनें घेईल.

**कौस०**—राम, लक्ष्मण, हें तुह्मी काय आरंभिलें आहे?—माझ्या सवतीचा मत्सर उद्यां मला छळूं लागला ह्मणजे मी कोणाच्यारे तोंडाकडे पाहून दिवस काढूं? कैकेयीचीच काय मंथरेचींहि आर्जवें करून मी जगावें, असें का तुमच्या मनांत आहे?

**राम०**—आई, मंथरेनें ग्रासलेल्या कैकेयीचें राज्य आज आहे हें खरें; पण ह्या संकटाचीं दुःखें तुला आज निमूटपणें भोगलीं पाहिजेत.—दुसरा मार्गच नाहीं म्हणून ह्या प्रसंगाला मी दुर्दैव ह्मणतों.—रघुकुलासारख्या उज्ज्वल व पवित्र कुळांत सवतीमत्सर शिरला; चौदा वर्षें वनवास भोगून मी सर्वांकरितां प्रायश्चित घेत आहें.—हा घरांतला मत्सर सिंहासनाला बाधतो आणि अखेर राष्ट्रकार्य व देवकार्य नष्ट होतें.—बायकाबायकांमधला मत्सर घरगुती वाटतो खरा, पण सत्याचा प्रकाश जर वेळींच त्या मत्सरावर पडला नाहीं तर कर्त्या व पराक्रमी पुरुषांतहि तो मत्सर शिरून मत्सराची कीड सर्व राजकाजाला लागते.—आई, सत्याशिवाय दुसऱ्या कशानेंहि मत्सराचा अग्नि शमत नाही.—आज कैकेयीच्या मत्सराचा अग्नि पेटलेला आहे, मला विझविता येत नाही—पण उद्यां मी आणि लक्ष्मण वनवासी होऊन दंडकारण्यांत राहूं लागल्यावर मत्सराचें मूळच आपोआप नाहींसें होणार आहे.—लक्ष्मण मागें राहिला असता तर रोग समूळ नष्ट झाला नसता.—उद्यां भरतराज्य सुरू झाल्यावर मत्सराचें राज्य संपेल आणि रघुकुलाला साजेशाच न्यायनीतीनें राज्यकारभार भरत पाहूं लागेल.—आई, हा सवतीमत्सराचा जांच दोन दिवसांचा आहे आणि तो जांच शांत चित्तानें व धैर्यानें तुझ्यासारख्या धर्मशील पतिव्रतेनें नाहीं सोसायचा तर कोणी सोसायचा? आई, तूं सवतीमत्सराच्या तोंडाशीं आहेस, मी चार पावलें दूर जात आहें—संकटाशीं प्रत्यक्ष झगडण्याचें तुझें धैर्य, आई, तुझ्या ह्या लेकरांना वनवासांत धैर्यशाली करील.—आई, तूं मत्सर जिंकलास ह्मणजे दंडकारण्यांतील सर्व दैत्यांना आम्ही जिंकलें म्हणून समज.

**कौस०**—भरतराज्य सुरू झाल्यावर कैकेयीच्या मनांतला मत्सर नष्ट होईल—नाहींरे बाळ तुला सवतीमत्सर समजत नाहीं.

राम०—आई, मत्सर ह्मणजे काय हें ह्या वनवासी रामाला बरोबर समजतें आहे—मत्सरापासून मी दोन पावलें दूर असल्यामुळें त्या मत्सराकडे मला नीट न्याहाळून पहातां येत आहे—आपला धर्म दुसरा पाळो वा न पाळो, आपण पाळावा ह्मणजे मत्सराला थाराच उरत नाहीं.—आई, भरत-राज्यांत तुझा धर्म तूं पाळ ह्मणजे रामाची आठवणच भरत तुला होऊं देणार नाहीं.

कौस०—रामा, तुझी मूर्ति माझ्या डोळ्यासमोरून हालणार! तुझी आठवण मी विसरणार! नाहींरे रामा, तुझा वियोग मला सहन व्हायचा नाहीं.—लक्ष्मण जसा दंडकारण्यांत जात आहे, तुझी ही जानकी जशी दंडका-रण्यांत जात आहे, मी तुझ्याबरोबर वनवासी होणार—मला ने बरोबर दंडकारण्यांत, तेथेंच तुला मी रोज आशीर्वाद देत जाईन—सीतेला जर तूं संभाळणार तर मी कां येऊं नये तुझ्याबरोबर दंडकारण्यांत ?

राम०—मी हिला बरोबर चल म्हणत नाहीं, हिचाच हट्ट आहे.—आई, हिनें तुझ्या सेवेला तुझ्यापाशीं रहावें किंवा जनकराजापाशीं माहेरीं रहावें.

सीता०—नवऱ्याला सोडून बायकांनीं वर्षानुवर्ष माहेरीं राहणें म्हणजे वनवासच होय.

राम०—पण माहेरच्या वनवासांत व दंडकारण्यातल्या वनवासांत फार अंतर आहे—प्रसंगामुळें तसें माहेरीं रहावें लागतें.—जनकराजानें गळ्यांतल्या ताइताहून अधिक नाजूकपणानें जिची जोपासना केली ती अरण्यांत दुःखें सोसूं लागल्यावर जनकराजाला काय वाटेल ?

सीता०—आपली मुलगी पतिव्रतेचा धर्म पाळीत आहे असें पाहून आईबापांना आनंदच होत असतो.—आपणाला सोडून मी कोठेंहि राहणार नाहीं, तो माझा धर्म नव्हे; आणि मला चौदा वर्षें माहेरीं रहा म्हणून सांगणें हा आपलाहि धर्म नव्हे.—वनवासाचे कष्ट आपल्याबरोबर सोसल्यानेंच मी आपली खरी अर्धांगी होणार आहें.

राम०—आई, ही बरोबर नको असें मी ह्मणूं शकत नाहीं—

कौस०—मग रामा, मलाहि बरोबर ने—

**राम०**—आई, ह्या वनवासी रामाला तसें वागतां येत नाहीं. आई, मी वनवासाला कोणावर रुसून, रागावून, किंवा त्रागा करून जात नाहीं; हौसेच्या किंवा धर्मश्रद्धेच्या यात्रेकरितांहि जात नाहीं.—यात्रेला जात असतों तर तुला आग्रह करकरून बरोबर नेली असती—त्रागा करून जात असतों तर माझी पक्षपाती म्हणून बरोबर तुला नेली असती.—सत्यपालनाचें रघुकुलाचें व्रत अखंड पाळलें जावें आणि त्यामुळें प्रत्येकाचें धर्माचरण शुद्ध रहावें म्हणून मी दंडकारण्यांत जात आहें—

**कौस०**—रामा, मग मी दंडकारण्यांत तापसीप्रमाणें राहून तुझ्या सहवासांत अग्नीची व नारायणाची सेवा जर केली तर त्यामुळें माझ्या धर्माचरणांत भर नाहीं का पडणार ?

**राम०**—आई, तसें वागण्याचा आज तुला अधिकार नाहीं—बाबांना सोडून दंडकारण्यांत तापसी होऊन राहणें हा तुझा आतांचा धर्म नव्हे.—माझ्या वियोगानें बाबा दुःखीकष्टी होणार—आई, बाबा सत्यनिष्ठ आहेत, पण माझ्या वियोगाच्या भीतीनें कैकेयीमातेला दिलेलें वचन पाळतांना त्यांच्या मनानें माघार घेतली—पुत्रस्नेह सत्याच्या आड येऊं लागला—अपत्यप्रेमाचा धागा मला मन घट्ट करून तोडावा लागला—बाबांच्या कोवळ्या हृदयाला ही जबर जखम रामानें केली आहे.—आई, अपत्यस्नेहाचा धागा कठोर सत्यानें तोडल्यामुळें विव्हल झालेल्या बाबांपासून दूर जाणें हा तुझ्या सारख्या साध्वीचा धर्म कसा समजला जाईल ?—बाबांची शुश्रूषा करणें, त्यांच्या मनाचें शांतवन करणें, आणि त्यांच्याकरितां नारायणाची व अग्नीची सेवा करणें, हा तुझा धर्म आहे—कसलेंहि संकट आलें तरी सर्व पतिव्रतांनीं हा सनातन धर्म पाळलेला आहे आणि ह्या सनातन धर्मावरच सत्याची प्रतिष्ठा अवलंबून आहे.—आई, कैकेयीमाता कितीहि तुला पाण्यांत पाहूं लागली आणि मथरेनें तुला कितीहि त्रास दिला तरी पतीच्या हितासाठीं देह झिजावेिणें हा पतिव्रतांचा धर्म जर तूं श्रद्धेनें पाळला नाहींस, तर तुझ्या रामाचें सत्याचरण विफल होईल.—रामाच्या सत्याला आधार आई, तुझा पातिव्रतेचा धर्म आहे.—आई, जेथें बाबा तेथेंच तूं राहिली पाहिजेस—तुला दुसरा मार्ग नाहीं. [ पडद्यांत 'देव रामचंद्राचें दर्शन आम्हाला घडूं द्या.' सुमंत्र येतो.

**सुमं०**—देव रामचंद्र, आपल्या दर्शनाकरितां नागरिकांच्या झुंडीच्या झुंडी बाहेर उभ्या असून देव रामचंद्राबरोबर आम्हीहि वनवासाला जाणार असा त्यांनीं आक्रोश चालविला आहे! चतुरंग सेनेचे नायक, तपस्वी ब्राह्मण आणि धनाढ्य नागरिक, यांनीं वसिष्ठ गुरुंना पुढें करून कैकेयीदेवीच्या मंदिराला घेरलें आहे आणि देव रामचंद्र यांच्या वाटेवर आडवे पडून आह्मी वनवासाला जाणाऱ्या देवापुढें धरणें धरणार, असा त्यांनीं हट्ट धरला आहे. वसिष्ठगुरुंच्या आज्ञेवरून मी देव रामचंद्राना कैकेयी देवीच्या मंदिराकडे नेण्याकारितां आलों आहें.

**राम०**—मातोश्रीचा आशीर्वाद मी घेतों आणि ह्याच पावलीं मी कैकेयीमातोश्रीच्या दर्शनाला येतों.–सुमंत्रमंत्री, पौरजनांना कळवा, कैकेयी मातोश्रीच्या मंदिरांतून वनवासाला जायला राम आतां इतक्यांत बाहेर पडेल; त्यावेळीं सर्वांचें दर्शन घेऊन लोकगंगेंत स्नान करूनच राम गंगापार होण्याकरितां वाट चालूं लागेल.–लक्ष्मणा, मजबरोबर चल, प्रथम तुझ्या आईचें दर्शन घेऊं आणि मग बाबांच्या व कैकेयीमातोश्रीच्या दर्शनाला जाऊं.

[ राम, लक्ष्मण, सीता कौसल्येच्या पायां पडतात.

**कौस०**—सत्यप्रतिज्ञ रामा, तुझा सर्वत्र विजय असो; पितृवत्सल रामा, तुझ्यामुळें रघुकुल व अयोध्यानगरी मोक्षास जावो; माझ्या लाडक्या रामा, सर्व तपस्व्यांची तपश्चर्या अरण्यांत तुझें रक्षण करो, आणि पतिव्रतांचें पुण्य सर्व सौभाग्याचें व मंगलांचें फळ माझ्या सीतेच्या पदरांत टाको.

**राम०**—ह्या दोन महासाध्वींच्या पुण्याईच्या पायावर रामाच्या सत्याची भव्य इमारत लक्ष्मणाच्या बाहूंनीं उभारली आहे, असें आई, चौदा वर्षांनंतर तुला पहायला मिळेल–हां हां म्हणतां चौदा वर्षें निघून जाऊन तुझा राम आई, दंडकारण्यांतून परत येईल.–तुझ्या आशीर्वादाचें सामर्थ्यच तसें आहे.

[ राम, लक्ष्मण, सीता जातात.

---

## प्रवेश तिसरा.

( **स्थळ**—अयोध्येचा रस्ता. दोन नागरिक प्रवेश करितात. )

**प ना०**—देव रामचंद्र ह्याच रस्त्यानें वनवासाला जाणार काय ? सर्व रस्ते स्त्रीपुरुषांनीं गच्च भरून गेले आहेत, रस्त्यांत मुंगीला शिरावयाला वाव नाहीं; मग वनवासाला तरी कोण जाणार ? मुख्य रस्ते अडलेले असल्यामुळें ह्या एकीकडच्या रस्त्यानें वनवासाला जातील म्हणून मी येथें उभा आहें; जातील ना ह्या रस्त्यानें देव रामचंद्र वनवासाला ?

**दु. ना०**—ह्याहि रस्त्यावर लोकांच्या झुंडीच्या झुंडी आल्या !—ह्या रस्त्यानें जरी देव रामचंद्र वनवासाला गेले तरी आह्माला दर्शन होणें कठिण आहे ! गर्दीत घुसल्याशिवाय दर्शन नाहीं—

**प. ना०**—एका गर्दीतून जीव वांचवून कसाबसा येथें आलों—समुद्राप्रमाणें लोकगंगा ह्यावेळीं अयोध्येंत वहात आहे—

**दु. ना०**—अरे खवळलेल्या समुद्राप्रमाणें म्हण—तुफानामध्यें जशा समुद्राच्या लाटा उंच उंच उठून एकावर एक आदळून समुद्राचें अक्राळविक्राळ स्वरूप दृष्टीस पडतें, तसें आज अयोध्यानगरीचें झालें आहे.—जो तो कैकेयीला शिव्याशाप देत आहे, जो तो देव रामचंद्राजवळ जावयाला जोरानें पुढें सरसावत आहे, आणि संताप व भक्ति ह्या दोन शक्तींनीं जनसमूहाचें मंथन आरंभल्यामुळें प्रत्येकजण बेफाम झाला आहे !

**प. ना०**—आम्ही दोघेंच कायते शुद्धीवर आहों—

**दु. ना०**—अरे, वसिष्ठासारखेहि ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध बेफाम झाले आहेत!

**प. ना०**—आणि इतर सर्व गोष्टी विसरून स्वतः वनवासाला जाण्याच्या बेतांत आहेत म्हणे—तसें झालें तर—

**दु. ना०**—अयोध्यानगरी ओसाड पडणार—

**प. ना०**—पण आपण दोघे शुद्धीवर असल्यामुळें आम्हा दोघांनाच अयोध्या नगरीच्या विशाल वाड्यांतून वनवासाप्रमाणें रहावें लागणार !

**दु. ना०**—कोणाच्या मनांतहि येत नाहीं अयोध्यानगरीचें पुढें काय होईल म्हणून—सर्वच कसे बेहोप झाले आहेत?

**प. ना०**—आम्ही दोघेच कायते शहाणे निघावेत हं!

**दु. ना०**—खवळलेल्या अयोध्यानगरींत आमच्यासारखा तिसरा शहाणा— [ दंडकेश्वर कण्हत येतो.

**दंड०**—मी तिसरा शहाणा आहें—माझी बायको मंथरा मला वेडा ह्मणते, पण कसा गर्दीतून निसटून एका बाजूला आलों!—जरा कंबर चेपा, तरच जगण्याची आशा—माझ्याप्रमाणें तुह्मांलाहि लाथा बसल्या कीं काय?—जरा चेपा कंबर—हा वेडा मेला म्हणून माझ्याबरोबरीच्या दासींनींहि ह्मटलें—मेलों, मेलों, म्हणून मी रडूं लागलों, मेलों मेलों म्हणून त्या रडूं लागल्या—कोण गर्दी!—चेपा कंबर, किती लाथा खाव्या लागल्या! समुद्राच्या लाटा जोरानें आल्या ह्मणजे खालीं डोकें करावें आणि लाटेला वरून जाऊं द्यावें, तसें ह्या शहाण्यानें केलें—जमीन धरून बसलों—पण वरून जाणाऱ्या लोकांच्या लाथा खातां खातां पुरे वाट झाली!—चेपा हाडें—जोरानें चेपा—समुद्राच्या बुडाशीं शिंपल्यांत मोतीं असतात, त्या दोन दासी मला मोत्याच्या शिंपल्या-सारख्या दिसल्या—बुडी मारून शिंपलें हातीं घेणार, असा तुडवला गेलों—कंबख्तीच झाली—मोत्यांचा नाद सोडून, बाजूला सरपटत सरपटत आलों,—तुम्ही दोघे शहाणे दिसला आणि लगेच मीहि तिसरा शहाणा झालों.—आहेना मी तुमच्यासारखा शहाणा?—चेपा कंबर—

**प. ना०**—आह्मी कांहीं लाथा खाल्ल्या नाहींत—

**दंड०**—मग तुह्मी अर्धे शहाणे आहांत—मार खावा लागतो, तेव्हां पुरता शहाणा होतो.—कणीक तिंबली जावी लागते—मी आळशी होतों का नव्हतों, ह्याची आतां आठवणच राहिली नाहीं—काय लाथांचा सुकाळ—चेपा कंबर—मारा बुक्या पाठीवर—मला वाटलें होतें अयोध्येचे सर्व लोक माझ्यासारखे आळशी असतील—पण माझ्या अंगावरून काय धांवले—थवेच्या थवे—हरणासारखे उड्या मारीत चालले—मी जमीन पकडून होतों—हूं का चूं केलें नाहीं—अशाच मारा बुक्क्या—जमिनीवर कोणाचेच पाय टेकले नाहींत—मला जर एकसारख्या लाथा बसल्या नसत्या तर चार अंगळें जमीन सोडून

चाललेल्या प्रचंड जनसमूहाची वाहवाच करीत मी निजून राहिलों असतों–पण लाथा इतक्या बसल्या हाडाहाडांतून झोंप आणि आळस निघून गेला–जांभई तेवढी शिल्लक राहिली आहे–जरा रगडा अंग.

[ चुटक्या वाजवीत दोन दासी येतात.

प. दा०—चुटक्या वाजविल्यानें आह्मी जिवंत राहिलों—

दु. दा०—लोकांच्या पायाखालीं सांपडून आह्मी निश्चेष्ट पडलों होतों–आह्मी मेलोंच, असें सर्व ह्मणाले–पण नेहमींच्या संवईमुळें शुद्धीवर येतांच आमचे हात आपोआप चुटक्या वाजवूं लागले—

प. दा०—आणि एकदोन सज्जनांचें लक्ष आमच्याकडे लागून त्यांनीं आह्माला या बाजूस आणून सोडलें—

दंड०—शहाणे मित्रहो, मी आतां आळस देतों आणि तुह्मीहि चुटक्या वाजवा ह्मणजे एखाद वेळेला ह्या दासीप्रमाणें गंडांतरांतून वांचाल–कोणी आळस देऊं लागला ह्मणजे चुटकी वाजविण्यास चुकूं नये; अपमृत्यु टळतो.

[ आळस देतो, चुटक्या वाजवितात.

प. ना०—अयोध्यानगरींत आतां आह्मां पांच शहाण्यांचें पंचायतन झालें.

दु. ना०—त्यांत दोन बायकाहि आहेत—

प. ना०—पण दोन बायका आणि तीन पुरुष, वाटणी कशी करायची?

दंड०—त्याची नको काळजी–मला आतां बायकांचा वीट आला आहे.–मी पंचायतनांतली मुख्य मूर्ति होतों, आणि तुह्मी चार मूर्ती चार बाजूला–संच चांगला जमला—

प. दा०—पण लोकांना मंथरेच्या चुगल्या सांगायला आम्ही नाहीं येणार तुमच्याबरोबर—

दु. दा०—मंथरेच्या विरुद्ध लोक आतांप्रमाणें पुन्हा खवळले–नकोग बाई, आह्मी मात्र लोकांच्या पायाखालीं सांपडून मरून जाऊं—

दंड०—अशा भिऊं नका–मी आळस देतांना किती माशा तोंडांत शिरून घशांत उतरतात, पत्ता आहे?–लोकांच्या थोड्या लाथाबुक्या सोसाव्यात, मग लोक माशांप्रमाणें घशांत उतरून पचनीं पडतात–मला मंथरेच्या चुगल्या अजून लोकांना सांगायच्या आहेत—

प. दा०—चुगल्या सांगतांना बायकांचा उपयोग फार होतो—

**दु. दा०**—पुरुष चुगलखोर असला ह्मणजे त्यावर लोकांचा विश्वास बसत नाहीं—

**दंड०**—बायकांनीं सांगितलेल्या चुगल्या पुरुषांना तेव्हांच पटतात–मी मंथरेविरुद्ध घसा कोरडा होईतों ओरडलों, पण कोणाचें लक्षच माझ्याकडे गेलें नाहीं.–पण ह्या फटाकड्यांना जेव्हां पुढें केल्या आणि मंथरेच्या विश्वासांतल्या ह्या दासी असें जेव्हां सर्वांना समजलें–ह्यांच्या प्रत्येक शब्दाबरोबर लोक खवळले.–बायकांच्या चुगल्या बायका सांगूं लागल्या, खरें खरें सांगताहेतसें वाटतें–दोन बायका पाहिजेतच माझ्या प्रभावळीत, एरव्हीं माझ्या चुगलीच्या धंद्याला तेजी यायची नाहीं.

**प. ना०**—पण आमचा काय उपयोग तुमच्या प्रभावळींत?

**दु. ना०**—आह्मांला तर लोक पायाखालीं नाहींना तुडविणार!

**दं. के०**—लोकांच्या लाथा चुकविण्यांत तुह्मी शहाणे, ह्मणून तर तुह्मी मला पाहिजेत–माझ्या पाटीची कणीक झाली आहे–तुमच्यासारखे शहाणेच मला मुख्य मंत्री करतील.–सर्व लोक रामाच्या नादीं लागून मंथरेवर उठले आहेत आणि दंडकारण्यांत जाण्याची तयारी करीत आहेत–माझ्या कंपूंत जर सामील आव्हां नाहीं तर मित्रे ह्मणून तुमची छीः थू होईल,–तुह्मांला शहाणे ह्मणून मिरवायला पाहिजे, माझ्यासारख्या मालकाची झूल तुमच्या अंगावर असल्याशिवाय मित्रेपणा झांकला जायचा नाहीं.–अहो मित्रा ह्मणजेच शहाणा आणि शहाणा ह्मणजेच मित्रा.–माझ्या पांघरुणाखालीं तुह्मी असला ह्मणजे तुह्मी शहाणे, पांघरुणाच्या बाहेर पडला ह्मणजे मित्रे.

**प. ना०**—पण या दासी आमच्या तैनातीला पाहिजेत—

**दु. ना०**—आमची झूल निराळी आणि ह्यांची झूल निराळी, असें होतां कामा नये—

**दंड०**—त्याची नको काळजी–तुह्मी मित्रे असून आळशी आणि चैनी दिसतां–तुमचे माझे ग्रह चांगले जुळतात–चुगल्यांत माझ्यासारखे पटाईत व्हा, ह्मणजे रामानें राज्य सोडलें आणि भरतानें संन्यास घेतला तरी तुह्मी आह्मी मिळून राज्य चालवूं.–शम्बर दैत्याच्या जवळ असतांना मी नुसता खुषमस्कऱ्या नव्हतों, नामांकित चुगलखोर होतों.–पुढें दशरथमहाराजांनीं मला अयोध्येस आणलें आणि मंथरेच्या नादानें मी आळशी झालों. आळस,

स्त्रीसेवा, जन्मभूमीची आवड, एखादा कायमचा रोग, आणि चुगली, हें पंचायतन ह्मणजे आळसेश्वर अशी माझी ख्याति हां हां ह्मणतां अयोध्येस झाली !–त्यामुळें मला महत्त्व प्राप्त झालें नाहीं; आतां तुमच्यासारखे दोन शहाणे मिळाल्यावर––

प. ना०—आम्ही झांकून टाकूं तुमचे दुर्गुण—

दु. ना०—नाहींतर आम्ही शहाणे कसले ?

दंड०—आतां कसें ठीक बोलला !–चला आतां मंथरेच्या विरुद्ध गवगवा करीत करीत आपण कैकेयीचें मंदिर गांठू–तेथें मंदिरांत घुसून लोकांचे पुढारी आपणच होऊं आणि रामानें राज्य सोडलेंच आहे–भरतानेंहि सोडलें ह्मणजे मी मुख्य मंत्री—

प. व दु. ना०—आणि आम्हीच राजे !

प. दा०—पण तुमच्याहि मनांत दंडकारण्यांत तपश्चर्येला जायचें आलें तर—

दंड०—लोकांनीं पायाखालीं तुडवून कंबरेचीं हाडेंच मोडलीं आहेत–आतां अयोध्या सोडून जायला माझ्या कंबरेंत बळ कोठें आहे ?–चौदा वर्षांनीं राम परत आल्यावर मग विचार करूं–चौदा वर्षे राजयोग माझ्या कपाळीं आतां आला, त्यांतून सुटका नाहीं.–मी एकसारखा आळस देतों, मगतर तुमची खात्री होईलना ?–( आळस देतो, चुटक्या वाजवितात ) आतां असें करूंया–या दासींचीहि हाडें खिडखिळीं झालीं आहेत, तेव्हां ह्या माझ्या पाठीवर बुक्क्या मारूं देत आणि तुमच्या खांद्यावर मी हात ठेवून चालतों–या असे जवळ–मित्रे ते मित्रे, मिजास पहा शूरांची–याहो शहाण्यानों, असे जवळ या आणि न्या मला उचलून कैकेयीच्या मंदिराकडे (दोन नागरिकांच्या खांद्यावर लेटून.) ओरडाग दासीनों, मंथरेला शिक्षा झालीच पाहिजे–ओरडा जोरानें–मंथरेला शिक्षा झालीच पाहिजे—

दो. दा०—मंथरेला जिवंत जाळली पाहिजे, मंथरेला जिवंत जाळली पाहिजे–चलायचें आतां कैकेयीच्या मंदिराकडे.

दंड०—बुक्क्या मारीत ढकला मला पुढें–शहाण्यांचा पराक्रम असा असतो. [ जातात.

---

## प्रवेश चौथा.

[ स्थळ, कैकेयीचें मंदीर. दशरथ दुःख करीत पडला आहे; एका बाजूस कैकेयी व मंथरा; दुसऱ्या बाजूस वसिष्ठ, कौसल्या व विजया; असा देखावा. ]

**वसि०**—महाराज, देव रामचंद्र यांजबरोबर सीता आणि लक्ष्मण वनवासाला जात आहेत, हें ऐकून अयोध्या नगरींत रहावें असें मलाहि वाटत नाहीं. चतुरंग सेनेचे नायक, विद्वान् ब्राह्मण, आणि धनाढ्य नागरिक यांनीं अरण्यांत जेथें सीता, राम व लक्ष्मण रहातील तेथें राहण्याचा बेत केला आहे, आणि या सर्वांना अरण्यांतील नव्या वस्तीचा मार्ग दाखवावा अशी माझी इच्छा आहे. तसें करण्याची परवानगी महाराजांनीं मला द्यावी.

**दश०**—गुरुजी, असें करा तसें करा म्हणून सांगणारा मी कोण? अयोध्येच्या सिंहासनाचा आणि माझा संबंध आतां संपला आहे. मी सिंहासनावरून खालीं उतरलों आहे आणि दुसरा राज्याभिषेक होईतों सर्व गोष्टींचा भार आतां आपल्या माथीं आहे.—रामाला राज्यावर बसवा, भरताला बसवा किंवा सर्वच्या सर्व अरण्यांत निघून जा, नको होय हाणण्याचा अधिकार मजकडे नाहीं.

**मंथ०**—तो अधिकार आतां राजमाता म्हणून कैकेयी देवीकडे आहे.

**कैके०**—चतुरंग सेनेला भरताच्या आज्ञेशिवाय कोठेंहि जातां यावयाचें नाहीं. आज जर सर्व सेना अयोध्येच्याबाहेर पडली तर माझ्या मुलाला राज्य कसचें मिळालें? फोलपट भरताच्या हातावर ठेवण्याचा बेत आहे काय?

**वसि०**—राम निघून गेल्यावर फोलपटाशिवाय येथें काय राहणार? देव भरत न्यायनीतींत निपुण आहे आणि रामाबरोबर वनवासाला जाऊं इच्छिणारांना भरताकडून केव्हांहि अडथळा होणार नाहीं.

**मंथ०**—राजाचा सैनिक म्हणून कोणासहि जातां यावयाचें नाहीं, वल्कलें नेसून सर्वच्या सर्व नागरिक निघून गेले तरी हरकत नाहीं.

**कैके०**—कैकय देशांतून भरताबरोबर इतक्या झुंडीच्याझुंडी येतील कीं अयोध्यानगरी दुप्पट गजबजलेली दिसेल! लोक निघून गेल्याची आह्मांला तितकीशी पर्वा नाहीं, पण शस्त्र किंवा संपत्ति यांचा लवलेशहि आह्मी अयोध्येच्या बाहेर पडूं देणार नाहीं.

**मंथ०**—धान्याचा कणहि बाहेर जाऊं देणार नाहीं. सुईच्या अग्रावरलि मातीहि कोणाला बरोबर नेतां यावयाची नाहीं.

**कौस०**—अयोध्येतलें कांहीं नको, पण कौसलदेशचे रथ, हत्ती, घोडे, रामाबरोबर पाठवावेत. माझ्या रामाला अरण्यांत आपण पडलों आहोंत असें वाटतां कामा नये.

**वसि०**—दंडकारण्यांत जेथें राम राहील तेथें नवें नगर दृष्टीस पडलें पाहिजे.

**कैके०**— नगरांत राहण्याची प्रतिज्ञा रामाची नाहीं.

**मंथ०**—वनवास रामानें पत्करलेला आहे, नगरवास नाहीं.

**विज०**—पण इतरांनीं नवी नगरी दंडकारण्यांत स्थापिली तर तुम्ही कोण नको ह्मणणार ?

**कैके०**—इतरांनीं करावें, पण आमच्या प्रजाजनांनीं तसें करूं नये.

**मंथ०**—आणि इतरांनीं तसें केलें तर अयोध्येला खिजविण्याचें प्रायश्चित इतरांना भोगावें लागेल. भरत लहान सहान योद्धा नाहीं.

**वसि०**—चतुरंग सेना राहिली, श्रीमत नागरिक राहिले, पण आह्मी सर्व अग्निहोत्री ब्राह्मणांनीं दंडकारण्याचा रस्ता धरला तर त्यांत कोणाचें कांहीं नुकसान नाहीं ना ?

**कैके०**—धर्मसंरक्षक भरत आहे, अयोध्येंत सर्वांच्या धर्माचें संगोपन करील; मग उगीच अग्निहोत्र दंडकारण्यांत नेण्याची घाई कां ?

**मंथ०**—जाईनात जुने अग्निहोत्री गांवाबाहेर; कैकेय देशांत दरिद्री अग्निहोत्र्यांच्या टोळ्याच्या टोळ्या आहेत.

**कौस०**—आईचें हृदय पडलें, बोलल्यावांचून रहावत नाहीं.–जायचा असेल राम दंडकारण्यांत तर जाऊं दे, पण आपला मुलगा ह्या पदवीला साजेसा माणसांचा व धनधान्याचा लवाजमा दंडकारण्यांत त्याजबरोबर असूं दे.

**दश०**—हा वाद माझ्या कानावर घालून मला आतां शेवटीं शेवटीं दुःख कां देतां ? राम वनवासाला जाणार तर आपणहि त्याच्याबरोबर वनवास स्वीकारावा; माझ्या मनानें तसें फार घेतलें.–तिसऱ्या आणि चौथ्या आश्रमाचेच माझे दिवस आहेत–मीहि अरण्यांत जावें असें माझ्या मनानें फार घेतलें;–कैकेयीलाहि मी आतां नको आहें—

**कैके०**—महाराज मला नकोत, असें मला कधीं वाटायचें नाहीं, भरताची शपथ, तसें माझ्या मनांतहि कधीं आलें नाहीं आणि यायचेंहि नाहीं.—महाराज माझ्या एकटीचे पाहिजेत—

**मंथ०**—भरतराज्यांत उगीच ढवळाढवळ करणारे नकोत—इतर प्रजाजनाप्रमाणें सुखासमाधानानें व राजनिष्ठेनें राहणारे महाराज कैकेयीदेवीला कोठें नकोसे आहेत ?

**विज०**—महाराज म्हणून नकोत, दास म्हणून पाहिजेत; असेंच ना ?

**दश०**—मला कवडीचीहि किंमत उरलेली नाहीं.—तिसरा आश्रम कसला आणि चौथा आश्रम कसला--चारहि आश्रमांच्या पलीकडे मी जितक्या लवकर जाईन तितकें बरें.—माझ्यामुळें राम वनवासाला जाणार !—गुरुजी, हें दुःख सोसण्याची ताकद मला नाहीं. धन्य तुम्ही, धन्य नागरिक, रामाबरोबर वनवासांत जाऊन रामाचें नित्य दर्शन घेऊं म्हणतां.—नाहीं हो, वनवासी राम माझ्या डोळ्यांना पाहवणारच नाहीं. सिंहासनावर बसलेला राम पाहण्याची ज्या डोळ्यांना उत्कट इच्छा ते माझे डोळे रामानें अयोध्या सोडल्याबरोबर कायमचे मिटल्यावांचून कसे राहतील ?—माझें तुम्हां सर्वांपाशीं एवढेंच मागणें आहे, कैकेयी, कौसल्ये, एवढीच भीक ह्या दुर्दैवी दशरथाला घाला, राम आतां येथें आल्यावर डोळे भरून त्याचें पवित्र रूप मला पाहूं द्या, त्याचे शब्द महामंत्राप्रमाणें माझ्या कानांना ऐकूं द्या, आणि त्याची सत्यनिष्ठा माझ्यापुढें मूर्तिमंत उभी असतांनाच मला डोळे कायमचे मिटूं द्या.—वनवासी राम पहाण्याकरितां हा दशरथ जिवंत राहूं इच्छीत नाहीं—युवराज राम पाहूनच देहावसान झालें पाहिजे.

**कौस०**—आपण असा धीर सोडून कसें होईल—अरण्यांत रामाचें रक्षण नीट व्हावें म्हणून मनुष्यबळ आणि द्रव्यबळ सदोदित रामाच्या जवळ ठेवण्याची व्यवस्था लावली पाहिजेना ?

**वसि०**—माझी झाली तरी हीच विनंति आहे.—दंडकारण्यांत रामाचें रक्षण झालें पाहिजेना ? [ राम, लक्ष्मण, सीता येतात.

**राम०**—माझें रक्षण गुरुजींची सत्याची शिकवणूक करणार आहे. बाबांचा आणि मातोश्रींचा आशीर्वाद हिचें रक्षण करण्यास पुरेसा आहे.—

रघुकुलाचा मूर्तिमंत पराक्रम हा माझा सौमित्र अरण्यांत माझ्या बरोबर असल्यावर, गुरुजी, माझ्या रक्षणाचा विचार कशाला ?

**दश०**—सीते, तूंहि दंडकारण्यांत जाणार—लक्ष्मणा, तूंहि जाणार—तुमचें रक्षण कोण करणार ?—गुरुजी, सुमित्रेचा मुलगा हा लक्ष्मण केवळ बंधुप्रेमामुळें वनवासाला जात आहे; जनकराजाची ही लाडकी मुलगी जानकी केवळ पतिप्रेमामुळें वनवासाला जात आहे; गुरुजी, मी संवर्धन केलेल्या रघुकुलांत सवतीमत्सर आहेसें तुम्हांला वाटतें काय ? कैकेयी, पहा ह्या लक्ष्मणाकडे—कैकेयी, पहा ह्या सीतेकडे—कैकेयी, पहा या रामाकडे—आणि खरें खरें मला सांग, राम राज्यावर बसला काय, भरत राज्यावर बसला काय, राजसत्तेचा दुरुपयोग करून इतर बांधवांना छळण्याची प्रवृत्ति या दशरथामुळें रघुकुलांत उत्पन्न होणारी आहे काय ?—गुरुजी, खरें खरें मला सांगा, मत्सरानें धिंगाणा घालावा इतकी बिघडलेली शिस्त रघुकुलांत माझ्यामुळें उत्पन्न झाली आहे काय ?—रघुकुलाची घडी माझ्यामुळें नाहींना बिघडली ?—ज्या माझ्या पूर्वजांना तसें वाटत असेल त्यांनीं माझ्या ह्या सत्यनिष्ठ रामाकडे पहावें, त्यांनीं माझ्या ह्या त्यागी लक्ष्मणाकडे पहावें, त्यांनीं माझ्या ह्या पतिव्रता सुनेकडे पहावें, आणि ह्या दुर्दैवी दशरथाला कामुकपणाच्या दोषांतून मुक्त करावें.—पितृवत्सल रामा, तूं आपल्या पित्याला धन्य केलें आहेस; बंधुप्रेमी लक्ष्मणा, तूं तुझ्या भावांना राम, भरत, शत्रुघ्न, सर्व भावांना धन्य केलें आहेस; पतिव्रते सीते, रघुकुलांतील सर्व स्त्रियांना, ह्या कौसल्येला, ह्या कैकेयीला, सुमित्रेला, सर्व स्त्रीजातीला तूं धन्य केलें आहेस.—ह्या धन्यतेंतच, गुरुजी, दशरथाचे डोळे मिटणें योग्य नाहीं काय ?

**वसि०**—राम, लक्ष्मण, सीता ह्यांच्या आत्मयज्ञापुढें इतर सर्व यज्ञ रद्द होत.—असल्या विभूतींकडून भरताचा छळ होईल, सवतीमत्सरामुळें कैकेयीदेवीची गांजणूक होईल, कैकेय देशच्या लोकांना सिंहासनावर बसलेला राम पाण्यांत पाहील, हें संभवतें तरी का ? मला येथें सर्व आत्मयज्ञी दिसत आहेत, रामाच्या वनवासाचें आपलें मागणें मागें घेऊन कैकेयी मातोश्री रघुकुलाच्या ह्या आत्मयज्ञावर ह्या वेळीं कळस चढविणार नाहींत काय ?

**राम०**—कैकेयी मातोश्रीचा भरत तसें करील, पण गुरुजी ती वेळ आतांची नव्हे.-आतांचा पुष्यनक्षत्राचा योग आह्मी तिघांनीं वनवासाला जाण्याचा आहे—चौदा वर्षें आह्मी दंडकारण्यांत काढलींच पाहिजेत.—कैकेयी मातोश्रीनें आपल्या मागणीचा आग्रह धरणें किंवा परत घेणें ह्या गोष्टीचा माझ्या वनवासाशीं आतां कांहीं संबंध उरलेला नाहीं. मातोश्रीनें मागणी जरी मागें घेतली तरी मला वनवासाला गेलेंच पाहिजे,—चौदा वर्षें रानावनांत ऋषींच्या राहणीनें रहाण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे आणि सत्याची सेवा माझ्या हातून घडावी ह्मणून मला तसें वागण्याशिवाय गत्यंतर नाहीं. मातोश्रींचा आशिर्वाद मला मिळाला ह्मणजे मी सर्व कांहीं मिळविलें.—आई, वर परत घेण्याचें प्रयोजनच आतां उरलेलें नाहीं.

**मंथ०**—ह्याला ह्मणावें खरें खरें बोलणें,—घटकेघटकेला जर मनुष्य बदलूं लागला तर वर मागायचें कशाला आणि द्यायचें तरी कशाला ?

**वसि०**—रामा, मी तपस्वी, मला तुझा सत्याग्रह समजतो; पण तूं रघुवंशांत जन्मला आहेस आणि रघूंच्या राज्याचें संरक्षण करण्यास तुझ्याइतका पराक्रमी दुसरा कोणी नाहीं.—मातोश्रींनीं जर तुला आपण होऊन राज्यावर बसविलें—समज, उद्यां भरतानें त्याला मिळालेलें राज्य आपण होऊन तुला परत केलें तर तूं अरण्यांतच रहाण्याचा आग्रह कां धरावास !—विरोधच नाहींसा झाल्यावर आग्रह तरी कसा शिल्लक राहणार ?

**राम०**—मी प्रतिज्ञा करायला कारण कोणतेंहि असो, प्रतिज्ञा केल्यानंतर शेवटपर्यंत प्रतिज्ञा पाळणें हाच सत्यनिष्ठांचा धर्म आहे. उद्यां भरतानें जरी मला आग्रह केला तरी अरण्यांतून मला चौदा वर्षें निघून जाईतों परत यायचें नाहीं.—गुरुजी, प्रतिज्ञा पाळणें हा सनातन धर्म आहे आणि ह्याच धर्मावर सत्याची प्रतिष्ठा अवलंबून आहे. हें सत्य केवळ कैकेयी मातोश्रीकरितां नाहीं, हें सत्य केवळ बाबांच्याकरितां नाहीं, किंवा एकट्या रामाकरितांहि नाहीं.—नुसत्या अयोध्येचा हा राम उरलेला नाहीं.—कोणत्याहि एका देशाचा किंवा एका काळाचा हा राम आतां नाहीं. सत्यनिष्ठांनीं एका देशावर किंवा काळावर नजर ठेवून भागत नाहीं. विश्वाच्या जोपासनेसाठीं ब्रह्मादिकांनीं जी अव्याहत तपश्चर्या चालविली आहे त्या तपश्चर्येंत सत्याचरण

हें प्रमुख अंग आहे. ती तपश्चर्या सर्व देशाकरितां व सर्व काळाकरितां आहे.—संसाराच्या प्रवाहांत आई आपल्या लेंकराला सोडून देते, मग लेंकरूं प्रवाहाचें होतें, आईचें रहात नाहीं. कैकेयीमातोश्रीनें सत्याच्या, ब्रह्मादिकांच्या प्रवाहांत मला सोडलें आहे; आतां चौदा वर्षे मी त्या प्रवाहाचा आहें; कैकेयीमातेचा नाहीं, कौसल्या देवीचा नाहीं, किंवा दशरथमहाराजांचाहि नाहीं. ह्मणून ह्मणतों गुरुजी, कैकेयी मातोश्रींचें मन वळवून किंवा भरताला तसें सांगून मला परत आणण्याचा नाद चौदा वर्षे सोडून द्या.

**कौस०**—प्रतिज्ञेचा भंग कर, असें रामा तुला आह्मीं ह्मणत नाहीं.—तुझा वियोग आमच्या कपाळीं, आमचें दुर्दैव; त्याकरितां रामा तूं खोटा होऊं नकोस. पण सीतेचें रक्षण अरण्यांत नीट नको कां व्हावयाला ?

**राम०**—आई, आज राम तरुण आहे, पण बाल्यावस्था संपते न संपते तोंच विश्वामित्र ऋषींनीं आपल्या यज्ञाचें संरक्षण करण्याकरितां रामलक्ष्मणाला मागून नेलें होते ना ?—त्यावेळीं विश्वामित्र ऋषींची अस्त्रविद्या आमच्यापाशीं नव्हती, आज ती अस्त्रविद्या आमच्यापाशीं आहे. रामलक्ष्मणाची अस्त्रविद्या जनकतनयेचें रक्षण करण्यास समर्थ आहे.

**कौस०**—तसें नव्हे रे बाळ. चार माणसें नेहमीं जवळ असल्याशिवाय संकट ओढून कसें येतें तें समजत नाहीं.—संकटाशीं तुह्मीं दोघे सिंहासारखे झुंजाल, पण तुमची नजर चुकवून संकट आलें तर ?

**वसि०**—विश्वामित्राचे यज्ञाचे वेळीं शेंकडो ब्राह्मण व ऋषी पाहऱ्याला होते.—अरण्यांत तुह्मीं तिघेंच; हा इकडे गेला तो तिकडे गेला, अशी संधी साधून संकटानें सीतादेवीवर घाला घातला तर ?—तें कांहीं नाहीं महाराज, सीतादेवीबरोबर कांहीं सैनिक, कांहीं अग्निहोत्री, आणि कांहीं धर्मशील नागरिक दंडकारण्यांत गेलेच पाहिजेत, आणि शेजाऱ्यासारखे त्यांनीं सीतेच्या आसपास राहिलेंच पाहिजे.

**दश०**—बरोबर आहे गुरुजी, निवडक सैनिक, तपस्वी अग्निहोत्री आणि धर्मनिष्ठ नागरिक ह्यांची सोबत माझ्या सुनेला अरण्यांत पाहिजेच.—लग्न झाल्यावर जानकीला जेव्हां जनकराजानें अयोध्येकडे पाठविली तेव्हां जनकराजानें वारंवार मला बजावलें, ही मुलगी माझा जीव किं प्राण आहे,

हिचें संगोपन आतां आपण केलें पाहिजे. त्यावेळीं, सासरीं आहों असें जानकीला अयोध्येंत वाटायचेंच नाहीं, असें आश्वासन मी जनकराजाला दिलें. गुरुजी, ती ही जानकी आज माझ्यामुळें वनवासी झाली आहे.—एकदां वाटतें हिच्यामुळें रघुकुल धन्य झालें, एकदां वाटतें नको तें सत्य, नको तो सत्याग्रह, आणि नको ती सत्यनिष्ठांची प्रतिष्ठा.—ही सीता वल्कलें नेसून कंद-मुळांवर राहून ऋषींच्या राहणीनें अरण्यांत राहूं लागली, आणि दुष्ट दैत्यांची पापी नजर हिच्यावर पडून संकट ओढवलें, दशरथा, रघुवंशांतल्या पुरुषांनीं जनकराजाला कसें तोंड दाखवावें?—कैकेयी, मी मरणोन्मुख झालों आहें, रामाचें शेवटचें दर्शन घेऊन डोळे मिटावे एवढीच काय ती माझी आतां इच्छा उरलेली आहे, पण वैरी चिंतीत नाहीं तें मन चिंतितें ह्या न्यायानें सीतेसंबंधानें विचार मनांत आले म्हणजे कैकेयी, मी पाहिजे तर तुझे पाय धरतों, आणि दांतीं तृण धरून तुला शरण जाऊन विनंति करितों, राज्याची मालकीण म्हणून तूंच चतुरंग सेनेपैकीं निवडक सैनिकांना सीतेच्या संरक्षणाकरितां दंडकारण्यांत जाण्याची आज्ञा कर.

**वासि०**—महाराजांनीं आतां जी विनंति केली तीच विनंति अयोध्येंतील सर्व प्रजाजनांची आहे.

**विज०**—सर्व लोकांकडून बरें म्हणून घेण्याची ही वेळ आहे, नाहीं तर लोक आतां करीत असलेल्या निंदेला पारावार राहणार नाहीं.

**मंथ०**—लोकनिंदेला कैकेयी देवी भीक घालणार नाहीं. आज अयोध्यानगरींत आमच्या बाजूचे चार बोलबेवडे भाट नाहींत, उद्यां कैकेय देशांतून आमचे चार भाट आल्यावर जो तो आमची स्तुति करूं लागेल. लोकांना काय, भाट बडबडतील तसें लोक बडबडूं लागतात.

**दश०**—लोकांची विनंति राहूं दे, ह्या दशरथाच्या शब्दाला कांहीं किंमत आहे काय?

**कैके०**—दीन बावळटांची हौस ही कैकेयी पुरवीत नसते.—सीतेवर संकट येईल असें जर सर्वांना वाटत असेल तर वनांत जाऊं नकोस असें सीतेला सांगा.—माझ्यापुढें सीतेच्या वनवासाचा किस्सा ठेवायचा आणि

त्या किल्ल्याच्या संरक्षणासाठीं माझ्यापाशीं चतुरंग सेनेची भीक मागायची ! मी निक्षून सांगतें मला नाहीं असलें कांहीं खपायचें.

**मंथ०**—राम, सीता, लक्ष्मण, ह्यांच्या सत्याच्या ताठ्याला असली भीक खपते का ? सीतेवरचें संकट रामाला जर निवारतां आलें नाहीं तर तसें दंडकारण्यांतून रामलक्ष्मणांनी भरताला सुचवावें, वाघासारखा भरत मदतीला धावून जाईल.

**कैके०**—मी त्यावेळीं भरताचें सारथ्य करीन आणि महाराज, शम्बर दैत्याला आपण जसें मारलेंत तसेंच दंडकारण्यांतील सर्व दैत्यांना मारून माझा भरत रामसीतेला संकटांतून सोडवील.

**मंथ०**—व्हायचेंच आहे पुढें तसें.

**लक्ष्म०**—कांहीं नाहीं तसें व्हायचें.–शिवधनुष्य सहज लीलेनें मोडून टाकणारी रामाची शक्ति विश्वांतील सर्व दैत्यांचा संहार करण्यास पुरेशी आहे. भरताच्या मदतीची जरूरी आह्मांला नाहीं.

**मंथ०**—पाहिलत कसा ताठा आहे; चतुरंग सेना कशाला ह्यांच्याबरोबर?– पण बाई रामानें आतांपासूनच जर मदतीची मागणी केली तर पुरवावयाचे होते आवडत्या मुलाचे लाड.

**कैके०**—रामा, वनवासाला जातांना तुझ्या रक्षणाला कांहीं सैनिक पाहिजेत का ?

**राम०**—आई, तुझा आशीर्वाद मला पाहिजे आहे आणि त्यासाठीं वनवासाला निघण्यापूर्वी मी येथें आलों आहें. वनवासांत आई, तुझ्या आशीर्वादानें आम्हां तिघांचें जितकें रक्षण होईल तितकें रक्षण चतुरंग सेनेच्या हातून होणार नाहीं. शिवाय आई, चतुरंग सेनेच्या आश्रयाला जर मी अरण्यांत राहीलों तर तो वनवास कसचा ?–हिच्या संरक्षणाची काळजी–नाहीं असें नाहीं–पण काळजी काय म्हणून करायची ? सत्याचरण मी सत्याकरितां करीत आहें त्यांत मला आनंद आहे, कसलेंहि दुःख सत्यनिष्ठांना नमतें–हिच्यावर संकट ओढवलें तर त्या संकटाशीं मी झुंजेन आणि झुंजेंत मृत्यु आला तर भीतीचें कांहींच कारण नाहीं.–कांहीं संकटें परमेश्वराधीन असतात; त्याबद्दल अगोदर व मागून वृथा शोक कां करावा ?

मंथ०—इश्शबाई, हाच का श्रीविष्णूचा अवतार! संकटें आलीं तर निमूटपणें सोशीत हाणे—कोणी मुकाट्यानें सोसतात कोणी ओक्साबोक्सी रडत सोसतात—मग अवतारांत जनरहाटीहून अधिक काय?

राम०—मी आहें हा असा आहें.—बाबांना, मातोश्रींना, आणि गुरुजींना आशीर्वाद मागतांना इतकेंच सांगावयाचें आहे, विरहाच्या दिवसाशिवाय रामाचे वनवासांतील दिवस सुखाचेच जातील.

कौस०—रामा, तूं कांहीं सांगितलेंस तरी स्त्रीजात म्हणून मी ह्मणतें, सीतेला मोठ्या लवाजम्याची सोबत अरण्यांत पाहिजेच पाहिजे,—रघुकुलांतील स्त्रियांच्या अब्रूचा हा प्रश्न आहे, आणि सवत म्हणून माझ्या हातून जे अपराध झाले असतील त्यांची मला क्षमा करून रघुकुलांतील स्त्रियांच्या अब्रूच्या दृष्टीनें राजमातेकडून विचार व्हावा, अशी पदर पसरून—

सीता०—सासूबाई, माझें थोडें ऐकून घ्यावें आणि मग काय मागायचें असेल तें मागून घ्यावें.—ह्यांच्या सहवासांत माझे दिवस सुखाचे जातील—पातिव्रता म्हणून माझा काळ आनंदांत जाईलच जाईल; राजधानींत कधीं पाहावयास न मिळणारा इकडचा पराक्रम मला रोज वनवासांत पहावयास मिळेल, ह्याहून अधिक सुख तें कोणतें?—सासूबाई, मला वनवासाची हौस आहे. माझ्या हातावरच तशीं चिन्हें आहेत. सामुद्रिकांनीं बाबांना तीं चिन्हें दाखविलीं, गुरुजी, आपण मुलगी पहावयाला आला त्या वेळीं बाबानीं तीं चिन्हें आपणाला दाखविलीं, आणि ह्या मुलीमुळें रानावनांचें महाराष्ट्र बनावयाचें आहे असें भाकीत आपणास निवेदन केलें—

वसि०—वनवासाच्या हौसेमुळें संकटें ओढवतील असें मी जनकराजाला त्यावेळींहि बोललों होतों—

सीता०—बाबानीं दिलेलें उत्तर, गुरुजी, आपण विसरलांत काय?—ह्या सीतेला वनवासाची हौस म्हणूनच शिवधनुष्याचा भंग करणाऱ्या वीराला मला देऊन टाकण्याचा पण बाबांनीं लावला. तो पण जिंकला गेला त्या वेळींच माझ्या संरक्षणाची काळजी नष्ट झाली, आणि वनवासाची हौस पुरी होणार असें बाबांनीं ठरविलें.—माझ्या हौसेमुळें कोणचें अरण्य महाराष्ट्र होणार, हें माझ्या लहानपणीं सामुद्रिकांनीं बाबांना सांगितलें

नाहीं; पण समुद्रवलयांकित दंडकारण्यांत शिवधनुष्याचा भंग करणारे वीरमाणि राहणार, हें आतां समजल्यामुळें, मजवर दैत्यांच्या पापी नजरेचीं संकटें केव्हां येतात आणि सर्व राक्षसांचा संहार होऊन दंडकारण्याचें महाराष्ट्र केव्हां होतें, असें मला झालें आहे !—महाराष्ट्र बनविण्याला आह्मीं जात आहों.—वनवासाची हौस असलेल्या आपल्या ह्या सुनेला सैनिकांच्या संरक्षणाची जरुरी कांहीं नाहीं; प्रसाद ह्मणून वल्कलें मिळालीं ह्मणजे मी धन्य होईन.

कैके०—ऐकलें का सुनेचें बोलणें ? महाराष्ट्रांत रहायला जाते आहे ह्मणे, आणि महाराष्ट्रांच्या वैभवापुढें अयोध्येच्या वैभवाची सीतेला पर्वा नाहीं.—आजच नकोहो इतकी ऐट—होऊंद्या तर खरें दंडकारण्याचें महाराष्ट्र—

मंथ०—मग मी महाराष्ट्रांत रहायला जाईन आणि महाराष्ट्राचा नक्षाच उतरवीन.

राम०—आई, तुझ्या जवळ असलेलीं वल्कलें आह्मांला प्रसाद ह्मणून दे.

मंथ०—हा घ्यायचा वल्कलांचा प्रसाद. [ सीतेला वल्कलांचीं बोचकीं देते.

वासि०—येथें वल्कलांचें परिधान करण्याचें कारण नाहीं.—अरण्यांत ऋषींच्या राहणीनें रहावें, असा वर आहे.—गंगापार झाल्यावर वल्कलें नेसलीं पाहिजेत, आतां नेसण्याचें कारण नाहीं.

कैके०—आतां नेसा म्हणून मीहि सांगत नाहीं.

मंथ—त्या दरिद्री महाराष्ट्रांत गेल्यावर नेसा बरें वल्कलें.

राम०—आई, सिंहासनावर बसल्यावर भरतानें राज्ययंत्राची हेळसांड क्षणभरहि केली नाहीं आणि बाबांहूनहि अधिक कीर्ति भरतानें मिळविली, असें दंडकारण्यांत अयोध्येविषयीं ऋषींच्या मुखांतून मला ऐकावयाला मिळावें अशी माझी इच्छा आहे. आई, तसा तूं आशीर्वाद वनवासाला निघालेल्या ह्या रामाला दे. [ पायां पडतो.

कैके०—भरताची कीर्ति रामा, वनवासांत तुला नेहमीं ऐकावयाला मिळेल आणि त्या कीर्तीमुळें तुझ्या मनांत मत्सर उत्पन्न होणार नाहीं, असा मी तुला आशीर्वाद देत आहें. [ डोक्यावर हात ठेवते.

राम०—( उठून ) मातेनें मत्सर मारून टाकला, निर्भय झालों.—लक्ष्मणा अरण्यांत तूं मार्ग काढावास, हिनें त्या मार्गानें जावें, आणि संकट निवार ण्याकरितां हिच्यावर दृष्टि ठेवून मी हिच्यामागून चालावें, अशी मी शिस्त ठरविली आहे. लक्ष्मणा, मातोश्री, बाबा, व गुरुजी ह्यांच्या चरणांचें दर्शन घेऊन आह्मांला अरण्याचा मार्ग दाखीव कसा.

[ लक्ष्मण, सीता, सर्वांच्या चरणांचें वंदन करितात.

लक्ष्म०—दादा, हा मी तुमचा वाटाड्या वाट चालूं लागलों,—अ यावें माझ्या मागून.

राम०—बाबा, माझ्या वियोगामुळें आपणाला यातना होत आहेत आशीर्वादाच्या याचनेच्या आड त्या यातना येऊं देऊं नका.

[ सर्वांच्या चरणांचें वंदन करितें

वासि०—रामा, तूं मजसारख्या गुरूंचाहि गुरु आहेस—तुझ्या चरणा स्पर्शामुळें दंडकारण्य धर्मक्षेत्र ठरल्यावांचून राहणार नाहीं.

दश०—रामा, तुझें दर्शन सर्वांना पवित्र करील; जा, सत्यनिष्ठ राम धैर्यानें दंडकारण्यांत रहावयाला जा; कसाहि प्रसंग आला तरी सत्या कांस रामा, तूं सोडणार नाहींस असा माझा तुला आशीर्वाद आहे.—( प जाऊं लागतो ) रामा, थोडे मागें वळून पहा—तुझ्या सत्याचरणाची प्रत्यक्ष मूर्ति थोडा वेळ डोळ्यांत धरून ठेवूं दे—मजकडे पहात पहात— असेंच पहा—नीट डोळ्यांत धरून ठेवली तुझी सत्यमय मूर्ति—डोळ्यांनो, मि आतां तुह्मी कायमचे—राम—राम—राम [लक्ष्मण, सीता, राम जातात आ दशरथ कौसल्येच्या अंगावर मूर्च्छा येऊन पडतो. पडदा. ]

## समाप्त.